॥ श्री ॥ 

# तुलसी-प्रताप.

लेखक व प्रकाशक

प्रभाकर बाळाजी ओगले,
('निंबप्रभाव' व 'चिकित्साप्रभाकर' कर्ते)
मुक्काम-ओगलेवाडी,
पो० औंध, जि० सातारा.



मुद्रक
शंकर नरहर जोशी,
चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव पेठ, पुणें शहर.

---

शके १८५३

किंमत ३ आणे.

# प्रस्तावना.

ह्या भरतखंडांत सर्व हिंदु जातींत फार प्राचीन काळापासून तुळस ही पूज्य मानीत आले आहेत. प्रत्येक घराजवळ तुळशीकट्टयांत किंवा कुंडींत, बागेंत, देवस्थानांत वगैरे ठिकाणीं पवित्र जागेंत तुळशीचें झाड असतेंच आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज आदिकरून सर्व स्त्रीपुरुष भक्तिपूर्वक तुळशीच्या झाडाचें संगोपन करून पूजा करितात. प्राचीन काळापासून सर्व आर्य ऋषी, सर्व राजे व लोक तुळशीची भक्ति करीत आले आहेत. तुळशीच्या पावित्र्याबद्दल व महत्त्वाबद्दल पद्मपुराण, स्कंदपुराण, वृन्दावनमाहात्म्य, तुळसीमाहात्म्य, विष्णुपुराण वगैरे ग्रंथांत तर फारच स्तुती केली आहे व हल्लींच्या काळींही तिचे औषधी महत्त्व व हवा शुद्ध करणेचे गुण ह्यांचा अनुभव घेऊन वैद्य व डॉक्टर लोक फारच तारीफ करून लिहीत आहेत. इंग्रजी, अमेरिकन व जर्मन डॉक्टरही अनेक प्रयोग करून पाहून तिची स्तुति करूं लागले आहेत. इतकेंच नव्हे तर आपल्या घराजवळ व बागेंत कांहीं लोक तुळशीचीं झाडें लावूं लागले आहेत.

अशा ह्या सर्व ठिकाणीं सर्वांनीं वाखाणिलेल्या या वनस्पतीच्या अंगीं औषधी गुण काय आहेत व त्यांचा रोग निवारण्याचे कामीं कसा उपयोग करावा, याची अनेक ठिकाणची माहिती मिळवून या पुस्तकांत संगृहित केली आहे. ही माहिती सर्वसाधारण लिहितां वाचतां येणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं वाचून उपयोग करून घ्यावा, म्हणून मराठींत अगदीं सोप्या भाषेत लिहिली आहे. करितां शहरांतील व खेड्यांतील सर्व कुटुंबवत्सलांनीं तिचा उपयोग करून घ्यावा अशी विनंति आहे.

ओगलेवाडी
मिति ज्येष्ठ शु॥ १
शके १८५३

प्रभाकर बाळाजी ओगले.

# रोगानुक्रमणिका.

# तुळसीसंबंधी धार्मिक विचार.



तुलसी काननं चैव गृहे यस्यावतिष्ठते ।

तद्गृहं तीर्थभूतं हि नायान्ति यमकिंकराः ॥ १ ॥

तुलस्यां नापरं किंचिद्दैवतं जगतीतले । तुलसी-वृंदावन जयाचें आंगणीं । प्रातःकाळीं दर्शन घडे नित्यानीं । त्याच्या पातकाची होय धुणी । तो पुण्य प्राणी जाणावा ॥ २ ॥

तुळस असे ज्याचे द्वारीं । लक्ष्मी वसे त्याचे घरीं । तेथें येवोनि श्रीहरी । क्रीडा करी आनंदें ॥ ३ ॥

ज्याचे द्वारीं तुलसी-वृंदावन । तयासी लक्ष्मीचे काय उणें । स्वयें नारायण आपण । वसे तेथें ॥ ४ ॥

ज्या नारी तुलसीपूजन करिती । त्या सदा सौभाग्यवती होती । पुत्रपौत्र संपत्ति । होय तुलसीपूजनें ॥ ५ ॥

ज्या नारी तुलसीपूजा चुकती । पुढील जन्मीं सौभाग्यहीन होती । हा वृत्तांत सांगे श्रीपती । उद्धवा लागोनिया ॥ ६ ॥

द्वारीं असावें तुलसी–वृंदावन । प्रातःकाळीं करावें नमन । सव्य घालोनिया जाण । कार्याकारणें लागावें ॥ ७ ॥

मुखप्रक्षालन होता प्रातःकाळीं । जावे वृंदावनाजवळी । जोडोनिया बद्धांजुळी । ऐसें स्तवावें तुलसीसी ॥ ८ ॥

यन्मूले सर्व तीर्थानि । यन्मध्यें सर्व देवताः । यदग्रे सर्व वेदाश्च । तुलसी त्वां नमाम्यहम् ॥ ९ ॥

जपः–तुलसी श्रीसखिशुभे, पापहारिणि पुण्य दे । नमस्ते नारद-
नुते, नारायण मनः प्रिये ॥ १० ॥

हा मंत्र बत्तीस अक्षरीं । एकनिष्ठें जप करी । मनकामना होय पुरी । सत्य सत्य जाणावें ॥ ११ ॥

सायंप्रातर माध्यान्हीं । तुलसीचें ध्यान करोनी । पूजा करी एकाग्र मनीं । निश्चयानें ॥ १२ ॥

प्रातःकाळीं घडेल तुलसीचें दर्शन । तरी सहस्र गोदानाचें पुण्य । लक्ष्मी राहे संपूर्ण । तया घरीं जाणावें ॥ १३ ॥

अशक्त होय बळवंत । देहरोग जाती समस्त । परम होय पुण्यवंत । निश्चयेंची जाणावें ॥ १४ ॥

## हवा शुद्धकरणारे तुलसीचे गुणः—

तुलसीगंधमादाय यत्र गच्छति मारुतः ।
दिशोदशः पुनत्याशु भूतग्रामान् चतुर्विधान् ॥ १५ ॥
तुलसीविपिनस्यापि समन्तात् पावनं स्थलम् ।
क्रोशमात्रं भवत्येव गांगेयस्येव पायसः ॥ १६ ॥

अर्थः—तुलसीचा वास वाऱ्यानें जेथें जातो तेथें दाही दिशा, चार प्रकारचीं तत्त्वें म्हणजे आकाश, तेज, जल, पृथ्वी हीं लौकर शुद्ध होतात.

तुलसीच्या वनानें आसपास एक कोस जागा गंगाजलाप्रमाणें पावन होते.

ध्यायेच्च तुलसीं देवीम् । शामां कमललोचनाम् । धवलांकुश संसक्ताम् । पद्मासन निशेपिताम् ॥ १७ ॥

## श्रीतुलस्यै नमः ।

पतिव्रतेनें सेवा तुलसीची करितां । सद्भावें प्रदाक्षिणा घालितां । हळदीकुंकू सुवासिनीसी समर्पिता । सौभाग्यवर्धन होय तिचें ॥१८॥

## तुलसी-पूजेचें महत्त्व.

तुलसीचें भावें पूजन । पार्वतीनें केलें आपण । तिसी शंकर-प्राप्ति झाली जाण । तुळसीच्या कृपेनें ॥ १९ ॥

सावित्रीनें केलें तुलसीपूजन । ब्रह्मदेवा पावली आपण । ऐसें तुळसीचें महिमान । आहे देखा ॥ २० ॥

अरुंधती स्त्री वशिष्ठाची । सेवा करिती झाली तुलसीची । प्राप्ति झाली वसिष्ठाची । तियें लागी ॥ २१ ॥

रुक्मिणीस पाहिजे कृष्ण प्राप्ती । म्हणोनि सेवा झाली करिती । तुलसी कृपे झाली प्राप्ती । श्रीकृष्णाची ॥ २२ ॥

चातुर्मासीं सायंकाळीं । दीप लावी तुळसीजवळीं । नेम न टळावा कदा काळीं । त्याची फलश्रुती ऐसी असे ॥ २३ ॥

दीप लावोनि अर्पावा नैवेद्य । तृप्त होय परमानंद । त्या भक्ताचा तो आनंद । वाणी पामराची पुरे ना ॥ २४ ॥

अष्ट महासिद्धी प्राप्त होती । चिंता जाईल दिगंतीं । संशय न धरावा चित्तिं । निश्चयें सांगती पुराणें ॥ २५ ॥

यानिकानिच पापानि । जन्मांतर कृतानिच । तानि सर्वाणि नस्यन्ति । प्रदक्षिणा पदे पदे ॥ २६ ॥

---

# तुलसी-प्रताप.

तुळशीचीं नांवें-( सं० ) तुलसी; ( हिंदी ) काली तुलसी, ( बं० ) कालतुलसी; ( का० ) तुळसी, करितुळसि; ( यु० ) रीहां; ( तु० ) कप्पुतोलचि; ( ता० ) तुळसि; ( ते० ) तुलसि; ( मला०) कृष्ण तुळसी; ( सिंगाली ) मुदुरु तुल्ल; ( कों० ) काळी तुळसी; ( इं० ) होली बेझिल् ( Holy Basil ).

वर्णन-तुळशींत २ जाती आहेत-कृष्ण ( काळी ) व श्वेत ( पांढरी. ) कृष्ण तुळशीचे सर्व भाग औषधांत वापरतात. फुलें येण्यापूर्वी तुळशीच्या झाडांत औषधि धर्म पूर्णपणें भरलेले असतात; म्हणून मंजिऱ्या आलेलीं तुळशीचीं झाडें वापरूं नयेत.

काळ्या तुळशीच्या झाडाला कृष्ण तुळस म्हणतात व पांढऱ्या तुळशीच्या झाडाला राम तुळस म्हणतात.

तुळशीच्या आणखीही हिरवी तुळस, तापमारी तुळस, मुर्कुटमारी तुळस, रानतुळस, मुत्री तुळस, [ सं० ] बर्बर तुळस, [ सबजा ], अजगंधा [ अबजला ], माली तुळस, वैजयंती तुळस, याप्रमाणें अनेक जाती आहेत. या सर्वांचें वरील तुळशीशीं जवळ जवळ साम्य असून शिवाय कांहीं कमजास्त गुणही आहेत. त्या सर्वांचा विचार येथें न करितां फक्त कृष्ण तुळस व राम तुळस, यांजबद्दलचेंच औषधि गुणधर्म व रोगपरिहारक गुण पुढें दाखविले आहेत-

**कै० वा० डॉ० वामन गणेश देसाई,**

एम्. बी. [ लंडन ऑनर्स ], बी. एस्सी. [ लंडन ]

एल्. एम्. अँड् एस्. [ मुंबई ] यांचे मत-

गुण-तुळसीचा अंगरस तीक्ष्ण, उष्ण व रूक्ष आहे. ह्यांत ज्वरघ्न, शीतहर, वातहर, कफघ्न, उत्तेजक आणि वायुनाशी असे धर्म आहेत;

परंतु ते सर्व सौम्य आहेत. तुळस हें प्रधान औषध म्हणतां येत नाहीं; अनुपानार्थ मात्र ही उत्तम आहे. तुळशीचा अंगरस १ ते ४ संध्येच्या पळ्या देतात. बीं मधुर, स्निग्ध व शीत आहे. यांत मूत्र–जननधर्म आहे.

## मदनपाल निघंटूचें मत.

तुलसी सुरसा गौरी भूतघ्नी बहुमंजरी ॥
तुलसी कटुका तिक्ता हृद्योष्णा दाहपित्तकृत् ॥
दीपनी कुष्ठकृच्छ्रास्रपार्श्वरुक्कफवातजित् ॥

अर्थ–तुलसी, सुरसा, गौरी, भूतघ्नी व बहुमंजरी हीं तुळशीचीं नांवें आहेत. तुळस ही तिखट, कडू, हृद्य, उष्ण, दाहपित्तकारक व दीपक आहे. ती कुष्ठ, मूत्ररोग, रक्तदोष, बरगड्यांचा शूल व कफ–वात यांचा नाश करते.

## भावप्रकाशकाराचें मत.

तुलसी सुरसा ग्राम्या सुलभा बहुमंजरी ॥
अपेतराक्षसी गौरी शूलघ्नी देवदुंदुभिः
तुलसी कटुका तिक्ता हृद्योष्णा दाहपित्तकृत् ।
दीपनी कुष्ठकृच्छ्रास्रपार्श्वरुक्कफवातजित् ॥
शुक्ला कृष्णा च तुलसी गुणैस्तुल्या प्रकीर्तिता ॥

काळ्या व पांढऱ्या तुळशीचीं नांवें व गुण–तुलसी, सुरसा, ग्राम्या, सुलभा, बहुमंजरी, अपेतराक्षसी, गौरी, शूलघ्नी व देवदुंदुभी हीं हिचीं संस्कृत नांवें आहेत.

ही तिखट, कडू, अग्निदीपक, हृदयाला हितकर, उष्ण, दाह व पित्तकर असून कुष्ठ, मूत्रकृच्छ्र, रक्तविकार, फांसळ्यांची पीडा, कफ व वात यांचा नाश करिते. दोन्ही तुळसी गुणानें सारख्याच आहेत.

## स्कंदपुराणांतील तुळशीचीं नांवें. *

तुळसी, श्री, आवश्यक, लक्ष्मी, विद्या, यशश्री, धर्माधर्म, देवी, देवदेवी, लक्ष्मी, सखी, शुभ भूमी, अचला, अमिला, आमळा, अशीं १६ नांवें आहेत. यांत लक्ष्मी नांव दोनदां आलें आहे.

वृन्दा म्हणजे तुळस यावरून वृन्दावन म्हणजे तुळशीचें झाड लाविलेला कट्टा असें म्हणतात. वृन्दावन असें तुळशीच्या बागेसही म्हणण्याचा पाठ आहे. गोकुळाजवळ वृन्दावन आहे हें प्रसिद्धच आहे.

घरासभोंवतीं मोकळ्या भागांत सबजा, रानतुळशी अगर देवतुळशीचीं रोपें, तसेंच लिंब, बिल्व व शमी हीं झाडें अवश्य लावून शुद्ध हवेची व्यवस्था ठेवावी.

इतर निघंटकारांचीं मतें—श्वेत व कृष्ण तुळस यांचे गुण—कडू, तिखट, उष्ण, हृद्य, पित्तल, दाहकर, अग्निदीपक, तुरट, लघु, असून वायु, कफ, श्वास, कास, हिध्मा, वांति, कृमि, दौर्गंध्य, पार्श्वशूल, कुष्ठ, विष, मूत्रकृच्छ्र, रक्तदोष, भूतबाधा, शूळ, उचकी, ज्वर यांची नाशक.

यावरून वरील सर्व ग्रंथकारांचीं मतें जवळजवळ सारखींच आहेत, असें दिसेल.

तुळशीचें झाड सुमारें १।२ हात उंच वाढतें. हीं झाडें बीं पडून पावसाळ्यांत आपोआप उगवतात. त्यांचीं रोपें ८।१० बोटें किंवा वीतभर उंच होतांच मुळासह ओलसर जागेंत लावावीं. किंवा कुंड्यांतूनही लावावीं. या झाडांस उन्हापेक्षां सावलट जागा फार आवडते व तेथें हीं झाडें जोमानें वाढतात. याचें उदाहरण पहावयाचें असल्यास हीं झाडें उंसाच्या फडांत किंवा हळदीच्या फडांत

---

* उत्पत्ति व महात्म्य यांचें फार अद्भुत वर्णन पुराणांतरीं केलें आहे. तें येथें न दाखवितां फक्त औषधि गुणधर्मांचा विचार केला आहे.

छातीइतकीं उंच व विस्तारानें वाढतात. तसेंच घरगुती आवारांत त्यांची नीट जोपासना केल्यास २।३ वर्षें हीं जगून त्यांचीं ३।४ बोटें घेराचीं काष्टेंहि होतात. ह्या काष्टांचे मणी वारकरी लोक गळ्यांत घालतात. तुळशीस मंजिरा येतात; त्यांत तिचें बीं असतें. ह्या मंजिऱ्यांच्या व तुळसीदळांचा देवपूजेकडे अगदीं अवश्य उपयोग करितात; कारण तुळशीशिवाय देवपूजा यथासांग होत नाहीं व तुळसीपत्राशिवाय आपल्या हिंदू धर्माप्रमाणें तीर्थ घेणें प्रशस्त व पवित्र होत नाहीं. प्रत्येक पूजेंतहि पत्रपुष्पांत अवश्य अशी तुळस ही असतेच, हें सर्वांस विदितच आहे. पांढऱ्या तुळशीपेक्षां काळी तुळस श्रेष्ठ मानितात व औषधी गुणानेंहि ती श्रेष्ठच आहे. तुळसीच्या झाडांत अनेक अपूर्व गुण असल्यामुळें आपल्या पूर्वीच्या ऋषिवर्यांनीं दूरदृष्टीनें सर्व लोकांच्या घरोघर तुळशीचीं झाडें असावींत अशी जी योजना करून ठेविली आहे, तींत त्यांचें पूर्ण शहाणपण व दूरदृष्टि व्यक्त होते. तुळशीचीं झाडें घराच्या आवारांत लाविल्यानें आरोग्य वाढतें. तुळशीच्या झाडांपासून एक प्रकारचा वायु उत्पन्न होऊन तो आसमंतांतील रोगकारक हवेचा नाश करून हवा शुद्ध करतो. या अपूर्व गुणावरून तुळशीच्या झाडाची नित्य पूजा करावी व तिला प्रदक्षिणा घालाव्या, हा जो आपल्या धर्मात नित्यनेम सांगितला आहे, त्यापासून आपला फारच फायदा आहे, हें सहज दिसून येतें. तुळशीचीं झाडें फक्त हिंदुस्थानांतच आहेत. तुळशीच्या झाडासारख्या अपूर्व गुणकारी अनेक वनस्पती ईश्वरानें लोकांच्या सुखासाठीं निर्माण केल्या आहेत, ही ईश्वराची फारच मोठी देणगी आहे. घरांतील हवा शुद्ध राहण्यासाठीं हीं झाडें कुंड्यांत लावावीं व त्यांपैकीं १।२ कुंडे घरांतील वाहिवाटीच्या प्रत्येक भागांत व खोलींत ठेवावे. ते कुंडे संध्याकाळीं उघड्या ओटीवर आणून ठेवावे व तेथेंच सारी रात्र राहूं देऊन, दुसऱ्या दिवशीं

सहस्र तुळसी मंजिरीसह देवास वाहाव्या. त्यामध्यें महत्पुण्य सांगितलें आहे.

१३ एकादशीस तुलसीतीर्थ घेऊन उपोषण व जागरण करून हरिकीर्तन करावें. यांत महत्पुण्य सांगितलें आहे.

आतां हिंदुस्थानाबाहेरील शास्त्रीय शोधकांचें मत तुळशीबद्दल काय आहे तें पहा—

मुंबईच्या ग्रँड मेडिकल कॉलेजांत सर जॉर्ज बर्डवुड नांवाचे एक प्रोफेसर होते. त्यांनींच राणीचा बाग बसविला. त्या वेळीं ती जागा दलदलीची असल्यामुळें तेथें चिलटांचा भारी उपद्रव होत असे त्यांचा नाश करण्यासाठीं सरसाहेबांनीं सर्वत्र तुळशीचें ताटवेचे ताटवे लाविले. त्यामुळें तेथून चिलटांचें उच्चाटन झालें.

मेजर लारीमोर यांनीं तुळशीच्या हवेनें चिलटें मरतात त्यामुळें मलेरिया नाहींसा होतो, असा स्वानुभवाचा शेरा दिलेला आहे.

लंडनमध्यें इंपिरिअल इन्स्टिटयूट नांवाची एक प्रयोगशाळा आहे. तेथें डॉ० गोल्डिंग व वेली या दोघां रसायनशास्त्रज्ञांनीं तुळशीच्या पानांचें परीक्षण करून असें ठरविलें आहे कीं, या पानांत रोगजंतुनाशक तेल सांपडतें. तें थॉयमॉल द्रव्याच्या गुणानें युक्त असतें. हें तेल हवेंत उडून जाणारें आहे. शास्त्रीय प्रयोगांनीं तुळशीच्या तेलांत शेंकडा ३२ थॉयमॉल असल्याचें सिद्ध झालें आहे. वनस्पतिशास्त्रज्ञ डॉ० हूपर यांनींही तुळशींत थॉयमॉल असल्याचें प्रसिद्ध केलें आहे. शस्त्रक्रियेस व क्षतें साफ ठेवण्यास थॉयमॉलचा अतिशय उपयोग होतो. अशा औषधी द्रव्यांचा हवेंत उत्सर्ग करणाऱ्या तुळशीचीं रोपें घराच्या आवारांत लावल्यास हवा शुद्ध होते असें तज्ज्ञाचें मत आहे.

पाश्चात्य लोकही तुळशीला पवित्रच मानितात; कारण येशू ख्रिस्ताच्या थडग्यावर तुळशीचें रोप उगवलें होतें; म्हणून त्या तुळ-

शीच्या स्मरणार्थ ग्रीसमध्यें " सैंट बेसिल डे " या नांवाचा सण पाळण्यांत आलेला आहे. अद्यापीही कित्येक धार्मिक वृत्तीच्या स्त्रिया त्या दिवशीं तुळसीची फांदी घेऊन त्यांच्या धर्मोपदेशकाकडे जातात आणि त्याजकडून त्या तुळशीच्या फांदीवर पवित्र जलाचें सिंचन करून तीं घरीं आणितात आणि पानें खुडून राहिलेली डहाळी घरांत टांगून ठेवितात. त्यापासून आरोग्य वाढतें. व घरांत रोगाचा प्रवेश होत नाहीं, अशी तेथल्या धार्मिक लोकांची समजूत आहे.

# तुळशीचे औषधि गुण.

## १ अग्निमांद्य.

तुळशीच्या पाल्याचा रस ५ मिऱ्यांचें चूर्ण घालून निजतेवेळीं मधांतून चाटावें. अग्निमांद्यावर हें उत्तम औषध आहे. ७ दिवस.

## २ अतिसार.

रक्तातिसारास–तुळशीचें बीं प्रमाण पाव तोळा. रात्रीं ५ तोळे पाण्यांत भिजत घालून सकाळीं कोळून प्यावें. दिवस ३. रक्तातिसारास हें उत्तम औषध आहे.

## ३ आध्मान.

तुळशीच्या पानांचा फांट प्यावा. दि. ३ ते ७.

## ४ अरुचि.

( १ ) तुळशीचा काढा किंवा रस, मध व पिंपळीची पुड घालून चाटावा. ( २ ) तुळशीचा रस, आल्याचा रस व पिंपळी एकत्र करून चाटावी. तोंडास चव येते.

## ५ आमवात.

तुळशीचा व कवठाचा पाला १।१ तोळा घेऊन फांट किंवा काढा करून मध घालून प्यावा.

## ६ आलस.

तुळशीचा फांट, गूळ व मिऱ्यांचें चूर्ण घालून पाजावें.

## ७ उचकी.

तुळशीच्या रसाचे २।२ थेंब दोन्ही नाकपुडींत घालावा. उताणे निजवून घातल्यास शिंका येऊन उचकी राहते. तसेंच रस मध घालून पोटांतही द्यावा.

## ८ कर्णरोग.

१ कान फुटल्यास–तुळशीचा व माक्याचा रस एकत्र करून कानांत घालावा. दि. ३।५

२ कर्णरोगांत–तुळशीचा रस कानांत पिळावा. दि. ३.

३ कर्णनादास–तुळशीचा रस कानांत घालावा. दि. ३.

## ९ कफरोग.

१ तुळस, आलें व अडुळसा यांचा रस मध घालून द्यावा.

२ तुळशीचा रस मध घालून द्यावा. दि. ७.

३ तुळशीचा रस, मध, मिरें, टांकणखार घालून चाटवावा. कफावर हें फार वस्ताद आहे. कफ व श्वास जातो. दि. ७

## १० कुष्ठ.

१ नायट्यास–तुळशींतील माती व तुळशीचा पाला एकत्र वाटून चोळावा. दि ३ रोज २ वेळां.

२ गजकर्णास–तुळशीचा रस रोज २।३ वेळ चोळावा. किंवा तूप, कळीचा चुना व तुळशीच्या पानांचा रस या तिन्ही जिनसा काशाच्या भांड्यांत एकत्र खलून लावावें. गजकर्ण जातें. दि. ३।५.

## ११ क्रुमी.

घरांत डांस वगैरे क्रुमींचा नाश होण्याकरितां तुळशीच्या पानांचा काढा घरांत शिंपडावा. तुळशीपेक्षां रानतुळशीचा फार उपयोग

होतो. घरासभोंवतीं जितकीं तुळशीचीं झाडें लावतां येतील तितकीं लावावीं म्हणजे डांस, चिलटें, पिसवा, मुरकुटें, वगैरे कीटक नाहींसे होतात.

## १२ चर्मगत कृमिरोगास.

चाई लागून केस जातात त्यास तुळशीचा रस चोळून त्यावर सोनें चोळावें. दि० १४।२१

## १३ कंडू.

तुळस, कडू पडवळ, कडूनिंब ह्यांचा पाला व मंजिष्ट ह्यांचें उटणें लावून वाळल्यावर स्नान करावें.

## १४ घर्म.

१ तापांत घाम येण्यास तुळस, गवती चहा, पिंपळी, यांचा काढा, सुंठ व गूळ घालून द्यावा.

२ तुळशीचा चहा दिल्यास लवकर घाम येतो.

## १५ जखम.

जखमेस—तुळशीचा पाला वाटून बांधावा.

## १६ ज्वर.

१ एक तोळा तुळशीचा पाला घेऊन फांट करून १० मिऱ्यांचें चूर्ण व गूळ घालून द्यावा. घाम येऊन ज्वर कमी होतो. ३ दि.

२ विषमज्वरास— काळ्या तुळशीच्या पानांच्या १ तोळा रसांत १ चिमटीभर मिऱ्याचें चूर्ण व मध घालून चाटवावें. रोज सकाळ संध्याकाळ. दि० ३. हटकून गुण येतो.

३ आगंतुक ज्वरास—काळया तुळशीचीं पानें, सुंठ व खडी-साखर यांचा काढा सकाळ संध्याकाळ द्यावा. दि. ३

४ कृष्णमधुरा ज्वरास—काळी तुळस व रानतुळस, अजबला, यांचा रस मध घालून पाजावा. दि. ३।७

५ विषमज्वरास–तुळशीच्या १० पानांत २।३ मिऱ्यांचें चूर्ण घालून गुळांत कालवून गोळी करून द्यावी. दि. ३।७ दोन्ही वेळां.

६ सर्दीपासून ज्वर आल्यास—तुळशीचा रस, मध व मिऱ्यांची पूड घालून पाजावा. म्हणजे सर्दी छातींत उतरत नाहीं व छातींत उतरलेल्या सर्दीस कफ पडून बरें वाटतें. दि. ३।७

७ सांधे सुजून येणाऱ्या ज्वरांत–तुळशीच्या मुळांचा फांट द्यावा. दि. ३ सकाळ संध्याकाळ.

८ विषारी ज्वरांत किंवा पुष्कळ दिवस येणाऱ्या ज्वरांत तुळशी अंगरस अंगास व तोंडास चोळावा. म्हणजे रोग्यास उत्तेजन येतें व दुर्गन्धि नाहींशी होते व इतरांस त्या रोगाची बाधा होत नाहीं. दि. ७.

९ हिंवताप येणाऱ्या ठिकाणीं तुळशीचीं झाडें लावल्यास हिंवतापाचें भय नाहीं, असें आरोग्यखात्याचें मत आहे.

१० तुळशीचीं काष्ठें, गुग्गुळ किंवा हिराबोळ जाळल्यास–मुरकुटें, डांस, पिसवा जातात. हा धूप आजाऱ्याच्या खोलींत जरूर करावा.

११ दालचिनी, लवंग मिरी यांचें चूर्ण तुळशीचे रसांतून व रोज सकाळीं मधांतून घेतल्यास हिंवतापाचें साथीचें भय रहात नाहीं.

१२ थंडी होऊन ताप आला असल्यास–तुळशीच्या पानांचा रस मीठ घालून उन करून द्यावा. दि. ३।७ दोन्हीं वेळां.

१३ मलेरियाच्या तापांत—तुळशीच्या रसाचा चांगला उपयोग होतो रोज ३ वेळां. दि. ३.

१४ अंग दुखून ज्वर येत असल्यास—ओंवा, निर्गुडी, तुळस ह्यांचा काढा द्यावा. दि. ३

१५ विषारी ज्वरांत अथवा पुष्कळ दिवस येत असलेल्या ज्वरांत तुळशीचा अंगरस रोग्याच्या अंगावर व तोंडांत चोळल्यानें रोग्यास

उत्तेजन येतें व दुर्गंधी जाते आणि इतरांस त्याच्या रोगाची बाधा होत नाहीं. दि. ३।५.

१६ हिंवताप येणाऱ्या जागेंत तुळशीचीं झाडें लावल्यास साथ कमी होते व तुळशीचीं पानें, हिरवाबोळ, गुग्गूळ यांची धुरी केल्यास आजाऱ्याच्या खोलींतील मुरकुटें मरतात किंवा पळतात. व पुन्हां त्या जागीं येतच नाहींत.

१७ आंतड्यामध्यें तुळशीचा विपाक वातप्रशन व कृमिघ्न आहे. म्हणून रस मध घालून द्यावा. दि. ३ दोही वेळां.

१८ ज्वरांत घाम आणण्यास तुळशीचा—चहा—तुळशीचीं पानें १ तोळा, मिरीं दाणे २० कुटून घालून चहा करून साखर व थोडें दूध मिसळून रात्रीं निजतें वेळीं पाजावा. ह्याच्या सेवनानें थकवा न येतां घाम येऊन ताप जातो व जिभेस रुची येते. रक्तविकार जातो.

१९ अंगांत ताप असतांना किंवा नसतांना तुळशीच्या पानांचा रस अर्धा तोळा व मध पाव तोळा द्यावा. म्हणजे घाम उत्पन्न होऊन ताप निघतो, असें अनुभवास आलें आहे. तुळस अग्नि-दीपक व वातनाशक असल्यामुळें वरील उपाय उत्तम लागू पडतो. तुळशीचीं पानें गुळांतून मिरपूड घालून खाल्ल्यास ज्वर जातो.

२० काळ्या तुळशीच्या पानांचा अंगरस २ तोळे काढून त्यांत ३ मासे मध व तीन मिऱ्यांची पूड घालून द्यावें. सकाळ संध्याकाळ दोन्ही वेळां दिल्यानें तिजारें, चौथरें आणि सर्व विषमज्वर तीन दिवसांत नाश पावतात.

२१ प्लेगवर—लखनौ येथील सिव्हिल सर्जन ऑफिसांतील सुखदत्त पांडे लिहितात—तुळशीचीं पानें १ तोळा, दवण्याचीं पानें एक तोळा, मिरे १ तोळा, बारीक पिंपळी १ तोळा, आणि कापूर [ फूल ] ३ मासे, हीं सर्व लिंबुरसांत एकत्र खलून चार चार गुंजा वजनाच्या गोळ्या कराव्या. प्लेगच्या साधारण भरांत चार चार

गोळ्या दर तीन तासांनीं द्याव्या. ज्वराचा जोर जास्त असल्यास दोन दोन तासांनीं द्याव्या. दि. ३ ते ५.

## १७ तृषा.

१ तुलस्यादि काढा–तुळशीच्या मंजिऱ्या, सुंठ, पिंपळी, द्राक्षें [ मनुका ], लवंग, विड्याच्या पानांचे देंठ, दालचिनी व खारीक हीं औषधें एक एक तोळा आणि लोध्र अर्धा तोळा यांचा काढा करून दिल्यानें तहान, दाह, ग्लानि, त्रिदोष यांचा नाश होतो. दि. ३.

## १८ दंतधावनास.

तुळशीचीं पानें १ तोळा, जटामांशी १ मासा, अक्कलखार ६ मासे, सैंधव ६ मासे, मोरचूद भाजून १ मासा, सुपारीचा कोळसा ६ मासे, रुमामस्तकी १ तोळा, बदामाची राख १ तोळा, वेलदोडे ३ मासे या सर्व जिनसा बारीक करून वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें, यानें दांतांचे सर्व रोग जातात.

## १९ दाहरोग.

अच्छेर पाण्यांत १ तोळा तुळशीचीं पानें घालून आधण आल्यावर साखर घालून प्यावा, पित्तामुळें झालेला दाह शांत होतो.

## २० नासारोग.

१ पिनसास–तुळशीच्या रसाचें नस्य करावें. दि. ३।७

२ वाळल्या तुळशीचें चूर्ण तपकिरीप्रमाणें वरचेवर ओढावें.

## २१ नेत्ररोग.

१ रातांधळ्यास–तुळशीच्या पाल्याचा रस सकाळसंध्याकाळ थेंब थेंब डोळ्यांत घालावा. दि. ७।१०. गुण चांगला येतो.

२ तुळशीचीं पानें व बेलाचीं पानें यांचा रस समभाग घेऊन त्या दोहोंच्या समान स्त्रीचें दूध घालून काशाच्या भांड्यांत लोखंडी

बत्त्यानें १ प्रहर खल करावा. नंतर तांब्याच्या बत्त्यानें १ प्रहर खलावें. तें काजळासारखें झालें म्हणजे त्याचें डोळ्यांत अंजन करावें म्हणजे नेत्रपाकासंबंधीं ठणका जातो.

३ डोळ्याच्या पापणीवर तुळशीचा रस लावल्यास डोळ्यावर चिलटें बसत नाहींत व त्यामुळें त्रास होत नाहीं.

## २२ परमा.

तुळशीचा हिम म्हणजे तुळशीचीं काष्ठें किंवा मुळें यांचें चूर्ण रात्रीं पाण्यांत घालून सकाळीं तें पाणी गाळून जिरे, साखर घालून प्यावें. दोन्ही वेळां. दि. ७.

## २३ बालरोग.

१ मुलांच्या ओकारीस—तुळशीच्या रसांत मध घालून चाटवावा.

२ मुलांची ओकारी व अतिसारास—काळ्या किंवा पांढऱ्या तुळशीचें बीं पाण्यांत भिजवून वाटून दुधांतून पाजावें. दि. ३।५. ओकारी व अतिसार जातो.

३ मुलांच्या देवीस किंवा देवीचे सांथीचे वेळीं तुळशीचा रस पाजावा. दि. ३।७

४ मुलांच्या पचननलिकेच्या दाहास—तुळशीच्या पानांचा काढा द्यावा. रोज देणें. यकृतविकारासही हेंच द्यावें. दि. ७.

५ मुलांस दांत येते वेळीं पांढऱ्या तुळशीचा रस द्यावा दि. ३।७.

६ मुलांचे कानांत दुखूं लागल्यास अगर सर्दी झाल्यास पोटांत व कानांत तुळशीचा रस घालावा. दि. ३।७.

७ लहान मुलांच्या अतिसारास व हगवणीस—तुळशीचा व गवती चहाचा काढा द्यावा. दि. ३।५।७ दोन्ही वेळां.

८ मुलांच्या पचननलिकेचा दाहयुक्त विकारांत व विशेषतः यकृत-वृद्धि असल्यास तुळशीच्या पानांचा फांट द्यावा. दि. ७.

९ माकडखोकल्यास–तुळशीच्या व करंजाच्या पानांचा रस मध घालून द्यावा. दि. ३।७. दोन्ही वेळां.

१० मुलाच्या छातीत कफ झाल्यास–तुळशीचा रस, मध व मिऱ्यांचें चूर्ण घालून त्यांत अर्धगुंजभार टांकणखाराची लाही घालून चाटवावा. दि. ३.

११ मुलांचे डोळे येण्याचे सांथींत आषाढ मासीं एका मुलाचे डोळे आले म्हणजे चिलटें त्याचा रोग दुसऱ्या मुलांच्या डोळ्यांवर बसून वाढवितात; करितां तुळशीचा रस पापणीवर लावावा म्हणजे चिलटें बसत नाहींत, व रोग वाढत नाहीं.

## २४ मूत्ररोग.

१ मूत्रदाहास—तुळशीच्या बियांचा हिम जिरें, साखर घालून पाजावा. दि. ३.

२ मूत्राश्मरी व बस्तिशोथ यांस—तुळशीचा हिम जिरें व खडीसाखर घालून द्यावा. दि. ७. दोन्ही वेळां.

३ उन्हाळ्यास–दूध व तितकेंच पाणी मिसळून त्यांत तुळशीचा रस आठवा हिस्सा घालून पाजावें. यानें लघवी सुटते.

४ अक्कलकादि काढा मूतखड्यावर—तुळशीचा रस, अक्कलकाला, सराट्याचें मूळ, लकड्या पाषाणभेद, एरंडमूळ, पिंपली, ज्येष्ठमध, काश गवताचे मूळ, निर्गुडी, लवंग, सुंठ, यांचा काढा करून त्यांत वेलदोड्याची पूड टाकून तो ७ दि. द्यावा. म्हणजे मोठा पीडाकारक मुतखडा व मुतावरोबर खर पडत असेल तीही जाते.

तुळशीचा रस ३ तोळे, तांतुळ्याचा रस २ तोळे, टांकणखार लाही १ गुंज, पाषाणभेद १ गुंज, गुग्गुळ १ गुंज, हे एकत्र करून द्यावे. दि. ७।१४. सकाळीं एक वेळ. यानें खडा फुटेल.

## २५ वातरोग.

१ वातहारक चूर्ण—काळी तुळस ६ भाग; कात्रे निर्गुडीचा

पाला ४ भाग, माक्याचा पाला ६ भाग, वापवर्ण्याचा पाला ७ भाग, यांचें दोही वेळां मधांतून पाव पाव तोळा प्रमाणांत द्यावे. दि. ७।१४.

२ वायूवर—तुळशीचा व आल्याचा रस मधांतून द्यावा अथवा तुळशीच्या रसांत मिरपूड व तूप किंवा मध घालून द्यावा. म्हणजे बलवत्तर वातरोगही जातो. दि. ७।१४.

३ धनुर्वातास–काळी तुळस, आलें, लसून व कांद्याचा रस एकत्र करून २ तोळे पाजावा. व पाठीचे कण्यास चोळावा.

४ तुळशीच्या रसानें आंतड्यांतील वात शमन होतो. व कृमी ही नाश पावतात.

## २६ वांति.

वांतीस–तुळशीच्या रसांत वेलदोड्याचें चूर्ण व मध घालून द्यावें किंवा नुसता रसच वरचेवर पाजावा.

## २७ विष ( स्थावर व जंगम. )

१ मण्याराचे विषास–काळ्या तुळशीच्या पाल्याचा रस नवटांक ( २॥ तोळे ) पर्यंत पाजावा. अथवा पानें चावून खावीं. दांतखीळ बसली असल्यास हाच रस नाकपुडींत घालावा व २ घटका तळहात व तळपाय चोळावे.

विंचू चावल्यास–तुळशीचा रस चोळावा व चढला असल्यास शिरेवरही रस चोळावा. उतार पडतो.

३ उंदराचे दंशास–तुळशीच्या रसांत अफू खलून लेप द्यावा.

४ सर्प व मण्याराचे विषास– नवटाक तुळशीचा रस पाजावा.

५ पोटांत गेलेल्या कोणत्याही विषास उतार–तुळशीचा रस पोटभर पाजावा. म्हणजे विषाचा जोर कमी होऊन मरणोन्मुख मनुष्यहि जगूं शकतो.

६ विषारी जंतूंच्या दंशापासून म्हणजे विंचू, गांधील माशी, कुंभारीण, भुंगा, मधमाशी, इत्यादि यांच्या दंशापासून होणाऱ्या वेदना तुळशीचा रस लावल्यास जातात.

७ तुळशीच्या रसांत मीठ घालून चोळल्यास विंचू उतरतो.

८ उंदराच्या दंशावर फासण्या टाकून त्याजवर-गाईचा दांत व मनशीळ ह्यांचा तुळशीच्या रसांतून लेप करावा म्हणजे विषाचा नाश होतो.

## २८ व्रण.

१ तुळशीच्या अंगरसानें वृण धुवावा, यामुळें किडे बसत नाहींत व लवकर भरून येतो.

२ माणसाच्या किंवा गुराच्या जखमेंत तुळशीचा रस किंवा पाला वाटून घातल्यास किडे न पडतां जखम भरून येते.

## २९ शीतपित्त.

तुळशीचा रस चोळावा. किंवा रस, तूप व चुना काशाच्या भांड्यांत खलून १।२ तासांनीं २।३ वेळ लावावा. अंगावरील गांधी व खाज जाते.

## ३० शैत्यास.

शैत्यास-तुळशीचा रस मिऱ्यांची पूड घालून द्यावा.

## ३१ सूज.

१ वातसुजेवर-तुळशीचा रस, मिरपूड व तूप घालून द्यावें. दि० ३।७

२ अंग दुखणें व सांधेसूज यांस-ओवा, निर्गुडीचा पाला व तुळस यांचा फांटा द्यावा. दि०

## ३२ स्त्रीरोग.

१ सोमरोगांस-तुळशीचा रस ४।५ तोळे व गाईचें तूप १।२ तोळे घालून देणें. दि० ३।७ हटकून गूण येतो.

२ वंध्यत्व जाण्यास-तुळशीचें बीं अर्धा तोळा घेऊन पाण्यांत वाटून प्रत्येक दिवशीं विटाळांत ३ दि० द्यावें. गर्भ राहील.

३ स्त्रियांचे योनिद्वारें अंग बाहेर पडल्यास-रानतुळशीचा व पुंगळीचा पाला हातावर चोळून त्यानें अंग दडपून आंत बसवावें, आंत जातें. दि० ३।४

४ तुळशीचा व गंधवेलीचा पाला व राळ एकत्र करून वाटून हातास लावून त्यानें अंग दडपावें, आंत जातें. दि० ३.

५ गरोदर स्त्रीचे वांतीस— आल्याचा रस, मिऱ्याची पूड, व अक्कलखार, तुळशीच्या रसांत मध घालून चाटवावा.

६ प्रदर ( धुपणी )—अजवल्याच्या म्हणजे ( रान तुळशीच्या ) पाल्याचा रस २ तोळे काढून तांदळाच्या धुवणाशीं द्यावा. दि०३।७ दोन्हीं वेळां. पथ्य—दूतभात, तूपभात.

## ३३ बाळंतरोगावर अनुभविक.

७ तुळस व माका यांचे पाले १।१ तोळा, गजग्याचा पाला १ तो०, एरंडाचा कोंवळा पाला १ तो०, सोन तरवडाचा पाला १ तो. वेलादाणे अर्धा तो०, पत्री, लवंगा १।१ तो० यांचा खल करून १४ गोळ्या कराव्या. सकाळ संध्याकाळ १।१ गोळी नुसती दि० ७ खाण्यास द्यावी. पथ्य गाईचें दूध व भात, दूधच घ्यावें. पाणी पिऊं नये. यानें बाळांतरोग व क्षयरोग हटकून जातो. हें फार अमोलिक औषध आहे. हें एका घराणदार वैद्याकडून फार आर्जवानें मिळविलें आहे.

८ स्तनांतील दूध शुद्ध होण्यास—तुळस, माका, निर्गुडी यांच्या रसाची स्वच्छ ओव्यास ७।७ पुटें देऊन आणि तो बाळंतिणीनें १५ दिवसानंतर दररोज रात्रीं निजते वेळीं अर्ध तोळा खाऊन ऊन पाण्याच्या घोटाबरोबर गिळावा म्हणजे वायू, पोट फुगणें, अंगांतील कळा, आध्मान, जडत्व हीं जाऊन पचनक्रिया वाढून स्तनांतील दूध शुद्ध होतें.

९. बाळंतपणांतील वायूस— खुरासनी ओव्याचें चूर्ण ३।४ गुंजा-

भार घेऊन तुळशीचा रस व मध यांतून द्यावें. बाळतवायूस हेंच उत्तम औषध आहे. दि० ३.

१० दूध शुद्ध होणेस व वात जाणेस-माका व तुळस यांच्या २ तोळे रसांत अश्वगंधीचें चूर्ण ०॥० तोळा किंवा पानांचा रस १ तोळा घेऊन मधांतून द्यावा. दि० ७ दोन्हीं वेळां.

## ३४ हृद्रोग.

फुफ्फुसदाहास-तुळशीचा व अडुळशाचा रस यांतून आनंदभैरव मध घालून गुंजभार द्यावा. दि० ३.

## ३५ वीर्यस्तंभन.

तुळशीच्या मुळाचें अर्धतोळा चूर्ण विड्यांतून खावें. (रतिसमर्थी) दि० ७।१४.



॥ श्री ॥

# निंब–प्रभाव.




लेखक व प्रकाशक

श्री० प्रभाकर बाळाजी ओगले,

( " चिकित्सा—प्रभाकर " कर्ते )

मुक्काम—ओगलेवाडी,

सं. औंध,( जि० सातारा. )





शके १८५४.





किंमत ४ आणे.

# प्रस्तावना.



निंब वृक्ष हा सर्व हिंदुस्थानांत अनादिकालापासून अशिक्षित व सुशिक्षित लोकांस माहीत आहे व गरिबापासून श्रीमंतापर्यंत सर्वांच्या आदरास पात्र झाला आहे. अशा या वृक्षाच्या अंगीं कोणते महत्त्वाचे गुण आहेत ते शोधपूर्वक प्रसिद्ध करावे, म्हणून मला जे सोपे व सार्वत्रिक उपयोगीं पडणारे प्रयोग वाटले, ते सर्व या लहानशा पुस्तकांत लिहिले आहेत. यांचा सर्वसाधारण लोकांस रोग–निवारणार्थ अल्पश्रमांत व अल्पखर्चांत उपयोग होईल. यांत खरूज–खांडकांपासून महारोग ( रक्तपिती ), बाळंतरोग यांवरीलही उपाय सांगितले आहेत.

यांत ४४ निरनिराळ्या रोगांवर १८४ उपाय दाखविले आहेत. ते अगदीं सोप्या मराठी भाषेंत लिहिले असल्यामुळें साधारण लिहितांवांचतां येणाऱ्या स्त्रीपुरुषांस समजतील. त्यांनीं व खेड्यांतील पाटील, कुलकर्णी, शाळा–मास्तर यांनींही याचा उपयोग करून घ्यावा अशी विनंती आहे.

मिति फाल्गुन वद्य १२ शके १८५१  प्रभाकर बाळाजी ओगले, मु. ओगलेवाडी.

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



पहिली आवृत्ति लवकर संपून पुष्कळ मागण्या शिल्लक असल्यामुळें ही दुसरी आवृत्ति काढणें भाग पडलें. या आवृत्तींत नवीन अधीक ९ प्रकरणें व ९५ प्रयोग असून अनेक संस्कृतग्रंथांच्या आधारें शोधपूर्वक घातले आहेत. यामुळें पहिले आवृत्तीपेक्षां ही आवृत्ति दीडपट मोठी झाली आहे. ह्या निंबप्रभाव पुस्तकाबद्दल केसरी, ज्ञानप्रकाश, वगैरे प्रमुख वर्तमानपत्रें व चित्रमयजगदादि प्रमुख मासिक पुस्तकें, वैद्य व डॉक्टर,

खेड्यांतील मास्तर व इतर लिहितांवाचतां येणारे पुरुष व स्त्रिया यांचेही यांतील औषधांच्या महत्त्वाबद्दल चांगले अभिप्राय आले आहेत.

हिंदुस्थानांतील उष्ण हवेच्या प्रत्येक खेड्यांत व गांवांत व रानांत व सडकेवर छायेसाठीं लावलेलीं हीं कडूनिंबाचीं झाडें असतातच, करितां गरीब लोकांनीं व श्रीमान लोकांनीं सुद्धां व डॉक्टर व वैद्य लोकांनीं या फुकट व पाहिजे तेथें सहज मिळणाऱ्या दिव्य औषधींचा उत्तम गुण व महत्त्वाकडे लक्ष देऊन हरवक्त उपयोग करून घ्यावा अशी विनंति आहे.

हें पुस्तक प्रत्येक गांवांत प्रत्येक कुटुंबवत्सलाचें घरीं असणें म्हणजे हरवक्त उपयोगी पडणारा वैद्य बाळगल्यासारखेंच आहे.

तारीख १५-४-१९३२
रामनवमी शके १८५४

मु. आंगलेवाडी.<br>
संस्थान औंध.<br>
जि. सातारा.

प्रभाकर बाळाजी आंगले.



# अनुक्रमणिका.



# निंबप्रभाव.



( सं० ) निंब, पारिभद्र, पिचुमर्द, ( म० ) बाळंतनिंब, कडूनिंब, बाळनिंब, ( हिं० ) नीम. ( बं० ) नीम, ( गु० ) लिंबडो, लिंबडा. ( का० ) बेविनमर. ( ता० ) वेंबु. ( ते० ) वेप. ( मला० ) निंबम्. ( को० ) बेवारुकु. ( इंडियन् लिलेक्. )

कडूनिंबाचा वृक्ष हिंदुस्थानांतच होतो. यानें सर्व हिंदुस्थान व्यापिलें आहे. हा थंड हवेच्या प्रदेशापेक्षां उष्ण हवेंत फार जोमानें वाढतो. तसेंच सजल प्रदेशापेक्षां, निर्जल प्रदेशांतली हवा या वृक्षास चांगली मानवते. निंबवृक्ष कोंकण–भागापेक्षां देशावर फार आढळतात. हीं झाडें बहुतकरून आपोआपच होतात; तरी सावली-करितां सडकेवर दोहीं बाजूंस मुद्दाम लावितात. या वृक्षाची छाया शांत, आरामकारक व शुद्ध असते; म्हणून देवालयें व सार्वजनिक जागा या ठिकाणीं हे लावण्याचा प्रघात प्राचीन काळापासून आहे. याशिवाय इतर जमिनींत आपोआप झालेले फार जुने व फार मोठे वृक्ष पुष्कळ आढळतात. हीं झाडें नुस्तें बीं पडून होत नाहींत; काव-ळ्यांनीं निंबोण्या खाऊन झाडाखालीं किंवा इतर ठिकाणीं त्यांच्या विष्टेंतून बीं पडून पावसाळ्यांत झाडें उगवतात किंवा तसल्या बिया जमवून पाहिजे त्या ठिकाणीं लागवड केल्यास लवकर उगवतात. येरवीं पडलेल्या बिया रुजत नाहींत. फार जुन्या निंबाच्या झाडाच्या खोडास चंदनासारखा वास येतो; म्हणून चंदनाच्या खोडांचा व्यापार करणारे लोक जुनीं निंबाचीं खोडें चंदनाच्या खोडांत मिस-ळून विकतात. कडूनिंबाच्या झाडाचीं पानें कात्रीदार असून शेवटीं टोंकें असतात व तीं मधल्या लांब कांडीच्या दोहीं बाजूस समोरा-समोर असतात. फुलें बारीक व पांढरीं असून डहाळीचे शेंवटास

त्यांचे घोंस असतात. निंबाचीं झाडें फाल्गून व चैत्रमासीं पालवून फुलतात; तेव्हां पांढऱ्या फुलांच्या तुऱ्यांनीं युक्त अशीं फार शोभिवंत व रम्य दिसतात व सभोंवार मनोहर सुगंध सुटतो. निंबोण्या रानबोराएवढ्या असून लांबोडया असतात व पिकल्या म्हणजे पिवळ्या दिससात व कडवट गोड लागतात. हीं फळें कावळ्यांस फार आवडतात. ह्या झाडाचें सर्वांग म्हणजे लांकूड, साल, पानें, काडया, फुलें, फळें, मुळें इत्यादि सर्वांगेंही उपयोगाचीं आहेत. लांकूड इमारतीस उत्तम समजतात, कारण तें किडत नाहीं व त्यास वाळवीही लागत नाहीं. बाकी सर्व भाग औषधाच्या उपयोगीं पडतात. ह्या उपयुक्त गुणांवरूनच आमच्या पूर्वींच्या ऋषींनीं यास पारिभद्र म्हणजे कल्पवृक्ष असें सयुक्तिक नांव दिलें आहे, तें योग्य वाटतें.

## निंबवृक्षाचीं संस्कृत नांवें.

निंबः स्यात्पिचुमर्दश्च पिचुमंदश्च तिक्तकः ॥
अरिष्टः पारिभद्रश्च हिंगुनिर्यास इत्यपि ॥

**अर्थः**—निंब, पिचुमर्द, पिचुमंद, तिक्तक, अरिष्ट, पारिभद्र, हिंगुनिर्यास.

अशा या अनेक गुणसंपन्न निंबवृक्षाच्या निरनिराळ्या अवयवांच्या अंगीं काय काय गुण आहेत, ते निघंटुकारांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहेत. यावरून वरील लेखाची सत्यता कळेल.

**कडूनिंबः**—शीत, कडू, ग्राहक, तिखट, अग्निमांद्यकारक, व्रणरोपक, सुजेला पिकविणारा व बालकांना हितकर असून, कृमि, वांति, कफ, सूज, पित्त, विष, वायु, कुष्ट, हृदयदाह, श्रम, ज्वर, खोकला, तहान, अरुचि, रक्तदोष, प्रमेह यांचा नाशक आहे.

**कोंवळीं पानें**:—ग्राहक, वातकर असून रक्त, पित्त व नेत्ररोग-नाशक आहेत.

**जून पानें**:—शोथघ्न, त्वचेस ओजक, त्वग्दोषहर, व्रणशोधन, व्रणरोपण, कोथ-प्रशमन, क्षुधा कमी-मंद करणारीं, कृमिघ्न व यकृतोत्तेजक आहेत.

**पिकलेलीं सुकीं पानें**:—कीड व कसर न लागण्याकरतां कपड्यांत व पुस्तकांत घालतात व घरांतील डांस, पिसवा, चिलटें, केंबरें वगैरे कृमिकीटक मरण्याकरितां जाळून धूर कोंडतात, त्यानें हवा शुद्ध होते.

**कडूनिंबाच्या काड्या**:—कास, श्वास, अर्श, गुल्म, कृमि, मेह यांचा नाश करतात.

**कोंवळें फळ**:—स्निग्ध, भेदक, व कडू असून, उष्ण, प्रमेह, मेह, कुष्ठ, कृमि, अर्श, ज्वरांतील दाह, यांचें नाशक आहे.

**पिकलेलें फळ**:—मधुर, स्निग्ध, कडू, गुरु, पिच्छिल असून कफ रोग, नेत्ररोग, रक्तपित्त, क्षतक्षय यांचें नाशक आहे.

**बीज**:—कुष्ठ व कृमिनाशक आहे.

**निंब-पंचांग**:—रक्तदोष, पित्त, कफ, व्रण, कुष्ठ व दाह यांचें नाशक आहे.

कडूनिंबाच्या सालीचा उपयोग तर वैद्यांस चिकित्सेचें कामीं काढे, चूर्णें, फांट, मलमें, तेलें वगैरे अनेकप्रकारें होत आहे. सालींत हवेंत उडणारें तेल, राळेसारखें कडू द्रव्य, पीठ, डिंक, शर्कराद्रव्य, कातासारखा कषाय व कडू स्वाळद्रव्य इतके पदार्थ आहेत. अंतरसाल तर कडू स्वाळद्रव्यांनीं भरलेली असते. बाह्यसालींत कातासारखें कषाय द्रव्य फार असतें. नुसता अंतरसालीचा काढा घेतला तर त्यांत हीं कडू द्रव्यें रहात नाहींत; फक्त कषायद्रव्य मात्र शिल्लक राहतें. पानांत सालीइतकें कडू द्रव्य नसतें. खारट

पदार्थांच्या संयोगानें कडूपणा कमी येतो. बियांच्या तेलांत बराच गंधकाचा अंश असतो, त्याचा कुष्ठनाशक साबण होतो.

**अंतरसालः**—शीतल, नियतकालिक, ज्वरप्रतिबंधक, ग्राही, पौष्टिक, कडू, त्वग्दोषहर, कृमिघ्न, शीतघ्न आणि रसायन आहे. यांतील कडू, खाळ, आम्लस्वभावी द्रव्य सेवन करणाराचें त्वचेंतून बाहेर पडतें. हें त्वचेस उत्तेजक व दाहशामक आहे. निंबाचा ज्वर-प्रतिबंधक धर्म सिंकोनाच्या सालीइतका आहे. अखंड सालींत ग्राही-पणा अधिक आहे. म्हणून तिची ग्राही पौष्टिक क्रिया अधिक घडते.

**बियांचें तेलः**—किंचित् उष्ण, कडू असून कृमी, कुष्ट, कफ, व्रण, वातपित्त, पित्त, अर्श, ज्वर, शोफोदर व जरा यांचें नाशक आहे. बियांत शेंकडा ४० टक्के तेल निघतें. यांचें आणखी गुण आहेत. ते असे:—पूतिहर, व्रणशोधन, व्रणरोपण, उत्तेजक, कोथ-प्रशमन, रक्तशोधकत्व, उत्तम कुष्ठनाशकत्व आणि रसायनही आहे. निंबाच्या सर्व भागांपेक्षां तेल विशेष जोरदार काम करणारें आहे. तेलाची क्रिया त्यांतील गंधकामुळें होते. निर्मळ तेलानें जास्त प्रमा-णांत दाह होतो; करितां आकृति–प्रकृतीचा विचार करून प्रमाण ठरवावें. अथवा त्यांत त्याच्या अर्ध्याइतकें तिळाचें तेल मिसळून द्यावें म्हणजे दाह होणार नाहीं. अस्सल तेलाचें प्रमाण ४ ते १० थेंब व तिळेल मिसळल्यास दीडपट ठेवावें. *

बियांचें तेल काढण्याचें तीन प्रकार आहेत. ते खालीं लिहिलेप्रमाणें.

**१ पहिला प्रकारः**—पिकून झाडाखालीं पडलेल्या व वाळलेल्या बिया जमवून, निवडून, स्वच्छ करून, फोडून, सालपटें पाखडून निवळ बिया वेगळ्या काढून, यंत्रांत दाबून, तेल काढून तें गाळून घ्यावें. हें निर्मळ व उत्तम निघतें.

---

* हें प्रमाण मोठ्या माणसाचें आहे.

**दुसरा प्रकार**—निंबबीज पहिल्या प्रकाराप्रमाणें सोलून घेऊन त्यावर साधारण भाजून, बारीक कुटून, चौपट पाण्यांत शिजवून निवाल्यावर पाण्यावर तेलाचा तवंग येतो. तो कापसाच्या बोळ्यानें काढून पिळून तेल घ्यावें.

**तिसरा प्रकार**—सोललेलें निंबबीज घेऊन चिंचोक्याचीं सालपटें घालून वांटून नंतर नारळाच्या पाण्यांत खलून ताटास लिंपून उन्हांत ठेवून तेल निचरून येईल तें काढून घ्यावें.

अर्क—कडूनिंबाच्या अंतरसालीचें चूर्ण ४० तोळे घेऊन रेक्टीफाईड स्पिरिटच्या ४० तोळ्यांत बाटलींत घालून बाटली ८ दिवस ठेवून दररोज बाटली हलवीत असावें. ८ दिवसांनंतर ब्लॉटिंग पेपरांतून गाळून घेऊन पुन्हां ४० तोळे दारूंत ( स्पिरिट ) घालून बाटली बंद करून ठेवावी. याचें घेण्याचें प्रमाण अर्धा तोळा आहे.

प्राचीनकाळापासून भरतखंडांत निंबवृक्षाच्या अंगीं असलेल्या अनेक अद्भूत गुणांची परीक्षा करून त्यास भू—लोकांतील कल्पवृक्ष असें अन्वर्थक नांव ऋषिवर्यांनीं दिलें आहे.

आपल्या आर्यधर्मांत वर्षारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदा हा मानला आहे. त्या दिवशीं प्रातःकाळीं अभ्यंग स्नान करून शुचिर्भूत होऊन अमृतापासून उत्पन्न झालेला व कल्पवृक्षासमान योग्यता असलेला जो निंबवृक्ष त्याचीं पानें भक्षावीं; म्हणजे मनुष्याचे संपूर्ण रोग नाश पावतात असें लिहिलें आहे, तें सत्य आहे, त्यांत अतिशयोक्ति नाहीं. कोणी म्हणेल यःकश्चित् कडूजार निंबाचें झाड तें काय आणि त्यास कल्पतरूची उपमा ? परंतु असें म्हणणारांस त्यांत असलेल्या गदानिग्रहाचे व इतर उपयोगांवरून कल्पतरू हें नांव योग्यच आहे असें कळून येईल. असो.

आतां प्रथम वर्षप्रतिपदेच्या ( पाडव्याच्या ) दिवशीं निंब कसा खावा तें सांगून नंतर त्याचा रोगनाशार्थ कसा उपयोग करून घ्यावा हें सांगतों.

निंबवृक्षाचीं कोवळीं पानें फुलांसह आणून त्यांत हिंग, मिरें, सैंधव, जिरें, ओवा हे पांच जिन्नस यथाभाग घालून सर्व एकत्र वांटून एक किंवा अर्धा तोळा भक्षण करावें. कोणी आवडीप्रमाणें चिंच, गूळ, मिश्र करून खातात. हें प्रमाण ३ तोळेही घेतात. मुलांमुलींस त्यांचे वयोमानाप्रमाणें द्यावें.

अशिक्षित व खेडाणी लोकांस पदार्थांचे गुणदोष माहीत नसतात; पण जे पदार्थ निरनिराळ्या रोगांवर हितावह असतात, ते कोणत्या-तरी प्रकारें योग्य वेळीं त्याच्या भक्षणांत यावे म्हणून शास्त्रकारांनीं चैत्र शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं निंब भक्षणांत यावा असा नियम घालून दिला आहे.

वास्तविक पाहतां नुसतीं पानेंच खाऊन किंवा पानांचा पाणी घालून वांटून रस काढून पिऊन तेजःपुंज निरोगी अशीं मनुष्यें व विरक्त असे बावा—बैरागी सशक्त असें पाहतोंच; यामुळें या वृक्षाच्या अंगचा अलौकिक गुण पाहून आश्चर्य वाटतें.

कडूनिंबाच्या अंगीं असे रोगपरिहारक व रोगानुत्पादक गुण असल्यामुळें त्याचा केव्हांही उपयोग करून घेतां येईल; मग चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशींच भक्षणविधि कां सांगितला आहे ? असा प्रश्न सहजच येतो.

चैत्रमास म्हणजे भर उन्हाळा. या दिवसांत नद्या, तळीं, विहिरी, ओढे यांतील पाणी आटून नद्या ओढे यांस खांडवे पडतात; तळ्यांतलें पाणी आटून कांहींत गुडघ्याइतकें तर कांहींत पाऊल न बुडेइतकें पाणी असतें; त्यांतच म्हशी बसविणें, म्हशी धुणें, कपडे धुणें, स्नान करणें व याहूनही घाणेरडे प्रकार घडतात;

त्यामुळें पाण्यांत अनेकप्रकारचे रोगजंतू उत्पन्न होऊन त्यांची वाढही अनुकूल स्थितीमुळें जलदीनें होते. ही स्थिती नदी, ओढे, तळीं वगैरेंची झाली. आंत उतरून पाणी भरण्याच्या विहिरी तर घाणीचीं कुंडेंच होत. तेथें वरील प्रकारापेक्षां अधिक घाणीचा नमुना पाहण्यास मिळतो. ओढून पाणी काढण्याच्या कांहीं विहिरी मात्र वरील प्रकारास अपवाद आहेत; त्यांत या वसंतऋतूंत जरी पाणी थोडें असलें तरी स्वच्छ व निर्दोष मिळतें; तथापि हे वळीव पावसाचे दिवस असल्यामुळें एखादा मोठा पाऊस पडला तर अस्वच्छभागांतील पाणी वाहून येऊन सांठल्यामुळें निर्दोष असें पाणी मिळणें साहजिकच अशक्य होतें. त्यांत या दिवसांत पाण्यांत तुरटीची पूड घालून आधण आणून निववून निर्दोष करून प्यालयास रोग होणेस प्रतिबंध होईल. परंतु इतका उपद्व्याप कोणी अज्ञ तर काय, पण सुज्ञही करीत नाहींत, यामुळें साहजिकच नारू, जंत, पटकी, इसब, वारूळ व इतर चर्मगत रोग इत्यादि लहानमोठ्या अंतर्बाह्यरोगांच्या प्रसारक सांथी उत्पन्न होऊन जनसंहार कसा होतो हें आपण पाहातोंच. या रोगप्रसारास आळा बसावा व दूषितजलापासून झालेल्या व होणाऱ्या रोगांचें निर्मूलन व्हावें व पुढें रोग होऊं नयेत म्हणून या निंबवृक्षाच्या पल्लवांची व फुलांची औषधमय चिकित्सा धर्मशास्त्रकारांनीं धर्मसंस्कारांत गोवून तिची योजना चैत्रमासांतच केली आहे; पण ही एक दिवसापुरतीच केली आहे, यापेक्षां एक महिनाभर निंबसेवन केल्यास त्या मनुष्यांस दूषित जलासंबंधीं व हवेसंबंधीं होणाऱ्या कोणत्याही रोगांचें भय नाहीं, हें अगदीं सत्य आहे.

निंब हा जात्या कडू असल्यामुळें स्वभावतःच कोणासही खाण्यास कठीण जातो. पण एकदां आरंभ करून दृढ निश्चयानें खाऊं लागल्यास मग त्याचें कांहींच वाटत नाहीं. उलट व्यसन किंवा संवयच लागते. इतर गांजा, अफू, चिरूट, कुचला, तंबाकू वगैरे मादक व

घातक पदार्थांच्या व्यसनांत गढलेले लोक आपण पुष्कळ पाहातों हे सर्व पदार्थ कडू आहेत; पण संवयीमुळें त्यांचें त्यांस कांहीं वाटत नाहीं. उलट त्या त्या व्यसनाच्या पदार्थाची तलफ आल म्हणजे तो पदार्थ न मिळाल्यास चैन पडत नाहीं आणि शरीराव व मेंदूवर त्याचा दुष्परिणाम होऊन आयुष्याचा नाश होतो; प कडूनिंबाची संवय किंवा व्यसन लावून घेतल्यास शरीरास हितावह रक्तशुद्धिकर, मेंदूस हितकर व शांतिदायक, शरीराचें तेज व ओ वाढविणारे, आरोग्यकारक, बलदायक, इत्यादि अनेक फायदे आहेत वर सांगितलेल्या गांजा, अफू वगैरे मादक व्यसनी पदार्थांस किंमत फा पडते यामुळें शरीराबरोबर द्रव्याचाही नाश होतो; पण कडूनिंब स प्रांतांत फुकट पाहिजे तितका मिळतो; करितां सुज्ञांनीं अवश्य याचा फायदा करून घ्यावा व आपलें व आपल्या कुटुंबांतील माणसांचें आरोग्य रक्षण करून घ्यावें; म्हणून पूर्वींच्या दयाळू सूज्ञ शास्त्रकारांनीं धर्मशास्त्रांत नियम घालून वर्षप्रतिपदा वर्षारंभ दिवशीं एक दिवस तरी निंब ( पल्लवपुष्पांसह ) भक्षण घडून आरोग्य मिळावें, अशी योजना केली आहे. आणखी कडूपणा कमी होऊन खाण्यास सुलभ व्हावें म्हणून निंबाच्या गुणाप्रमाणेंच जंतुनाशक पदार्थ मिरें, हिंग, सैंधव, ओंवा, जिरें यांचें मिश्रण घालून वांटून खावें असें प्रतिवर्षाच्या पंचांगांत आरंभींच सांगितलेलें असतें. सर्व आरोग्य, आयुष्य रक्षणारांनीं हा नियम एक महिना किंवा १५ दिवस किंवा ७ दिवस तरी पाळून अनुभव पहावा म्हणजे वरील लेखाबद्दलची खात्री होईल.

---

# निंबप्रभाव.



आतां कडूनिंबाच्या झाडाच्या अंगप्रत्यंगांचा औषधींच्या कामा रोगनिवारणार्थ कसा कसा उपयोग करावा, याचा खुलासा पुढें दाखविला आहे, त्याप्रमाणें करावा.

## १ अग्निमांद्य.

१ अग्निमांद्य, भ्रम, दाह, ज्वर, पोटशूळ, यांस कडूनिंबाची साल, कडू पडवळ, गुळवेल, यांचा अष्टमांश काढा करा. दिवस ७ ते १४ रात्रीं निकाढा द्यावा.

२ एक भाग कडूनिंबाच्या पानांचा रस, ६ भाग साखरेचे सरबत, मिसळून त्यांत लवंगा व मिरें यांचें चूर्ण घालून प्यावें म्हणजे पचनक्रिया वाढते.

## २ अपस्मार.

१ बकाणनिंबसाल, कडवी नाय, शेवग्याची साल, यांच्या काढ्यांत गोमूत्र व तिळाचें तेल मिसळून कढवून तेल उरल्यावर गाळून कुपींत ठेवावें. ह्याच्या मर्दनानें अपस्मार नष्ट होतो.

## ३ अफूस उतार.

१ कडूनिंबाच्या पाल्याचा रस वांती होईपर्यंत पाजावा.

## ४ अरुचि.

१ कडूनिंबाची साल व गुळवेल ह्यांचा आंगरस साखर घालून द्यावा. दि. ३.

## ५ अरुंशिका.

१ कडूनिंबाचीं पानें व सैंधव पाण्यांत वांटून लेप करावा. अरुंशिका जाते. ३।५.

## ६ आम्लपित्त.

**आम्लपित्तास उत्तम काढा:**—कडूनिंबाची साल, काडे-चिराईत, अडूळशाचीं पानें, गुळवेल, पित्तपापडा, हिरडा, बेहेडा, आवळकाठी, कडू पडवळ, ह्यांचा समभाग काढानिकाढा प्यावा. दि. ७ ते १४.

२ निंबाची साल, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, कडू पडवळ ह्यांचा काढा मध घालून प्यावा. तो दाह, ओकारी, व शूळ, व कफ यांस घालवितो. दि. ७.

३ कडू पडवळ व कडूनिंबसाल, ह्यांच्या काढ्याबरोबर ओकारीचें औषध द्यावें. आणि नळीतेडाचें चूर्ण, मध, आंवळकाठीचा काढा हेंच रेचन द्यावें.

४ कडूनिंबसाल, गुळवेल, चित्रक, कडूपडवळ, ह्यांचा काढानिकाढा निवाल्यावर मध घालून प्याल्यानें आम्लपित्त जातें. दि. ७।१४.

५ अडुळसा, गुळवेल, पित्तपापडा, कडूनिंबाची साल, चिराईत, माका, त्रिफळा, कुळथ्या ह्यांचा काढानिकाढा निवाल्यावर मध घालून प्यावा. आम्लपित्त जातें. दि. ७।१४.

६ एक भाग पंचनिंबचूर्ण ( पान, फूल, मूळ, साल व फळ ), २ भाग वरधारा, १० भाग सातू, सर्व एकत्र कुटून थंड पाण्यांत घालून त्यांत साखर घालून गोड करून प्यावें. भयंकर कफपित्तशूळ जातो, व त्यांत मध घालून प्याल्यानें कठीण आम्लपित्त जातें.

## ७ आरोग्य.

१ **सदा निरोगी राहाण्यास:**—कडूनिंबाचा पाला वांटून एक तोळा, हिंग १ गुंजभार, कापूर २ गुंजभार, गूळ १ तोळा हीं सर्व एकत्र खलून गोळी करून रोज रात्रीं निजतांना खावी. हें नित्य सेवन केल्यास प्रकृति निरोगी राहील.

२ कडूनिंबाच्या बियांचें तेल अर्धा तोळा व एरंडेल २ तोळे हें सकाळीं प्यावें म्हणजे रसायनाचा गुण देऊन आरोग्य व आयुष्य वाढवितें.

## ८ उटी.

१. कडूनिंबाचीं पानें, कोष्ट, हळद, दारुहळद, कडूपडवळ, शेवग्याचें बीं, चिरफळें, धने, शिरस, यांचें चूर्ण ताकांत कालवून प्रथम करंजाचें तेल अंगास लावून, चोळून मग वरील ताकांत कालविलेलें उटणें लावून वाळल्यावर स्नान करावें; म्हणजे कंडू, खरूज, पुटकुळ्या, कोष्ट, कुष्ट, सूज हीं सर्व जातात.

२ कडूनिंबाचा पाला, लोध्र, हिरडेदळ, आंब्याच्या झाडाची साल, डाळिंबाच्या फळाची साल ह्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून पाण्यांत कालवून उन्हामुळें व इतर कारणानें शरीरास आलेला काळसरपणा ह्या उटीनें जातो.

३ कडूनिंबाचा पाला, हिरडेदळ, आंब्यांच्या झाडाची साल, डाळिंबाचीं फुलें, मालतीचीं पानें, कचोरा, समभाग वांटून पाण्यांत कालवून उटी केल्यास अंग स्वच्छ होऊन त्वग्रोग जातात.

## ९ उदर.

१ जलोदर, वातरक्त, गुल्म, कुष्ट, प्लीहा, यकृत, भगंदर, वायु, कच्छपोदर, या सर्व रोगांस उत्तम औषध—कडूनिंबाचें पंचांग, समुद्रफेण, काडेचिराईत, आवळकाठी, हिरडा, बेहडा, माका, रानबावच्या, अश्वगंध, पांढरीवसु, देवदार, गुळवेल, कडूवृंदावनमूळ, गोरखमुंडी, शेवग्याची साल, देवडांगर, पळसाचेंमूळ, सर्व समान घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून त्यासमान देवडांगरी चूर्ण मिळवून हें चूर्ण थंड पाण्यांतून पावतोळा घेतल्यास वरील रोग जातात. हाच उत्तम उपाय आहे. दि. ७।१४।२१.

२ पांढरीवसु, कडूनिंबाची साल, कडूपडवळ, सुंठ, कुटकी, गुळवेल, दारूहळद, व हिरडा यांचा काढानिकाढा प्याल्यानें सर्वांग-सूज, उदर, श्वास, कास, शूळ आणि पांडुरोगही जातात. दि. ७।१४।२१.

## १० उन्माद.

१ कडूनिंबाची साल, अडोळसामूळ, खैरसाल, कडूपडवळाचीं पानें, गुळवेळ, आंवळकाठी यांचा काढा तुपाच्या चौपट घालून कढवून तूप उरलें म्हणजे गाळून रोज दोन वेळ नस्य करून पोटां-तही १—२ तोळे पाजावें; म्हणजे उन्माद, विसर्प, वातरक्त, कुष्ट, गुल्म हीं जातात.

## ११ उपदंश.

१ कडूनिंबाच्या पानांचा फांट दरवेळीं आठ ते दहा तोळे प्यावा. सकाळसंध्याकाळ दि. ७।१४. पथ्यः—तूप, रोटी, तुरीचें वरण, जोंधळ्याची भाकरी, मीठ वर्ज्य.

**२ फिरंगोपदंश किंवा गर्मीसः**—सकाळसंध्याकाळ कडू-निंबाच्या सालीचा काढा १ तोळा तूप घालून ८ ते १० तोळे-पर्यंत घ्यावा. काढा अष्टमांश करावा. दि. ७।१४।२१. आजाराच्या स्वरूपाप्रमाणें. पथ्य वरीलप्रमाणें.

३ बद, गांठ, व्रणाची सूज यांसः—कडूनिंबाचीं पानें वांटून ऊन करून बांधावीं.

४ उपदंशविकारानें शिश्नावर पुरळ, फोड, चट्टे, किंवा जखम झाल्यास निंबाच्या झाडाच्या पाल्याच्या काढ्यानें वरचेवर धुवून संकजिऱ्याची पूड बसवावी; जखम भरून येते. किंवा कडूनिंबाचे बियांचें तेल लावावें, लवकर गुण येतो.

५ कडूनिंबाची साल, कडू पडवळ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, खैरसाल, गुळवेल, प्रत्येकीं पाव तोळा घेऊन चेंचून ४० भार पाणी घालून अष्टमांश काढा करून सकाळीं व रात्रीं निकाढा प्यावा. प्रत्येक वेळीं काढा पितांना दीड मासा गुग्गुळ घालून प्यावा. दि. ७।१४. सर्वप्रकारचें उपदंशविकार जातात. पथ्यः—तेल, तिखट आणि स्त्री वर्ज्य.

६ **उपदंश-व्रण-संबंधीं:**—दाह, पू, स्राव, लाली यांस—कडूनिंबाचा पाला, करंजाचीं फळें, सागवान, बाभूळ, वड यांच्या सालींच्या कल्कांत चौपट पाणी व एकपट तूप घालून करून तूप उरलें म्हणजे गाळून ठेवून, दररोज व्रणाचे चव्यांस लावावें. उत्तम गुण येतो.

७ **उपदंशासंबंधी गर्मीस व कडकीसः**—कडूनिंबाच्या पाल्याचा रस ५ तोळे घेऊन त्यांत १ तोळा खडीसाखर घालून प्यावा. पाल्यांत पाणी घालून वाटल्याशिवाय रस निघत नाहीं हें ध्यानांत असावें. हें औषध सकाळसंध्याकाळ घ्यावें. दि. ७।१४।२१.

८ **उपदंशासंबंधी व्रणासः**—कडूनिंब, अर्जुनसादडा, पिंपळ, कळंब, सागवान, जांबूळ, वड, उंबर, वेत, यांच्या सालींचा काढा व्रण धुण्याकरितां घ्यावा, आणि त्यांच्या सालींच्या कल्कांत तूप सिद्ध करून व्रणावर लावावें.

९ **उपदंश**—सुवर्णवर्ख पानें ३, हिरव्याची पूड १॥ मासा, आवळ्याचें चूर्ण १॥ मासा, कडूनिंबाच्या पानांचें चूर्ण १॥ मासा, अंबेहळद १ मासा, गुळवेलीचें चूर्ण ३ मासे एकत्र करून त्याचे २ भाग करून गाईच्या तापविलेल्या दुधाबरोबर सकाळसंध्याकाळ घेतलें असतां ४० दिवसांत सर्व शरीरावर गर्मीच्यायोगानें आलेसा तांबडा पुरळ, फोड, मूत्रांत जाणारा बद्ध

पदार्थ ह्या सर्व व्याधी नाहींशा होतात. पण सोन्याचा वर्ख घातल्यास दुप्पट दिवस लागतात.

## उपदंशाचे व्रण धुणेस.

१ कडूनिंबपानें, रुईमूळ, जाईचीं पानें, सातवीणसाल, पांढरी कणेर, यांच्या काढ्यांत गोमूत्र घालून व्रण धुतल्यास व्रणांतील कीड मरून व्रण भरून येतो. दि. ७।१४.

२ कडूनिंबपानें, जाई, कडूपडवळ, कुटकी, दारुहळद, पांढरी उपळसरी, मंजिष्ठ, काळावाळा, सैंधव, मोरचूत, ज्येष्ठमध, या सर्वांसमान करंजाच्या बिया घेऊन सर्वांच्या कल्कांत तूप सिद्ध करून तें व्रणांत भरावें. म्हणजे बारीक तोंडाचे मांसमिश्रित खोल व स्रवणारे पीडादायक व्रण चांगले शुद्ध होऊन भरून येतात.

३ कडूनिंबाचीं पानें कडूपडवळ ह्यांचा काढा व्रण धुण्यास प्रशस्त आहे.

४ **व्रणांतील कृमिनाशास**—कडूनिंबपानें, निर्गुडीपानें, करंजपानें, यांचा रस व्रणासंबंधी कृमिनाशक उत्तम आहे. कडूनिंबाचीं पानें, सैंधव, तिळाचाकल्क, हळद, दारुहळद, तेड, ज्येष्ठमध, यांच्या लेपानें व्रण शुद्ध होऊन भरून येतात.

५ कडूनिंबसाल, धावडा, अर्जुन, कदंब, बोर, खैर, सिसवा, यांच्या अंतरसालीच्या काढ्यानें शिश्न धुतल्यानें शिश्नाच्या जखमा व्रण, फोड, घाव बरें होतात. दि. ३।७ रोज ३ वेळां धुवावें.

## १२ ऊरुस्तंभ.

१ दंतिमूळ, द्रवंती, ( जेपाळ ) तुळसपानें, पांढऱ्या मोहऱ्या टाकळीमूळ, शेवगासाल, वेखंड, कुडा, कडूनिंबसाल, यांचा रस किंवा काढा ऊन ऊन प्यायल्यानें ऊरुस्तंभ जातो. दि. ७.

## १३ उवा.

१ **डोकींतील उवांस व लिखांस:**—रात्रीं निजतेवेळीं कडू-निंबाच्या बिया वांटून डोईस माखून वर एरंडाचें पान बांधून त्यावर फडकें बांधून निजावें. सकाळीं साबण किंवा शिकेकाईनें धुवावें. उवांचा नाश होतो.

## १४ कामीण ( कामला. )

१ कडूनिंबाच्या अंतरसालीचा काढा; सुंठीचें चूर्ण व मध घालून द्यावा. रात्रीं निकाढा द्यावा. दि. ७, १४. पथ्य—तेलकट; आंबट वर्ज्य.

२ कडूनिंबाच्या पाल्याचा रस, त्रिफळ्याचा काढा, दारुहळदीचा काढा, गुळवेलीचा रस, ह्या ४ औषधीपैकीं एक सकाळीं मध घालून घेतलें तरी कामीण नाश पावतें. दि. ७, १४.

३ **कामला व पांडुरोगांस:**—कडूनिंबाचीसाल, त्रिफळा, गुळवेल, कुटकी, काडेचिराईत, अडुळसा, या ८ जिनसांचा काढा मध घालून प्यावा. कामीण व पांडुरोग जातो.

४ **कामला:**—कडूनिंबाच्या पानांचा रस, मध घालून सकाळीं प्यावा. दि. ७ कामला जाते.

## १५ कुष्ट.

१ कुष्ट, कंडू, पीटिका, कोठ, शोफ यांस—कडूनिंब, कडूपडवळ तुळस, हळद, दारुहळद, कोष्टकोळिंजन, आस्कंद, देवदार, शेवगा शिरस, चिरफळ, धणे, दालचिनी, समभाग चूर्ण ताकांत वांटून, पूर्वी शिरसाचें तेल अंगास लावून नंतर औषधानें तयार केलेलें ताक चोळावें. गुण चांगला येतो.

२ विस्फोट, उदर्द, कोठ, क्षत शीतपित्त, कंडू, रक्तपित्त यांस कडूनिंबाचीं पानें वाटून तुपाबरोबर अथवा आवळकाठीबरोबर खावीं गुण चांगला येतो. दि. ३।७।१४ रोगमानाप्रमाणें.

## पांढऱ्या कोडास.

३ निंबोण्या, आस्कंद, वावडिंग, चित्रक, बिब्बा, बाहवा, दंतिमूळ हीं कांजींत वाटन लेप करावा; पांढरा कोड जातो. दि. २१.

४ कडूनिंबपानें, गुंजा, कोष्टकोळिंजन, बेखंड, हीं पाण्यां वांटून लेप करावा. पांढरें कोड जातें. दि. २१.

५ पांढरी गोकर्णीमूळ, कडूनिंबपानें, निर्गुडीकाळीमूळ, पाण्यां वांटून लेप करावा. श्वेतकुष्ट जातें. दि. २१.

६ निंबोण्या, गंधक, बिबा, वावडिंग, दंतीमूळ, बाहवा, चित्रक कांजींत वांटून लेप करावा. पांढरें कोड जातें. दि. २१.

७ कडूनिंबसाल, खैरसाल, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, कडू पडवळ, गुळवेल, अडुळसा, ह्यांचा काढानिकाढा घेतल्यास कंडू, विस्फोटादि कुष्ट जातात. दि. २१.

८ **सर्व कुष्टांवरः**—कडूनिंबाचीं मुळें, पानें, फळें, फुलें, साल, हीं पांच अंगें घेऊन बारीक चूर्ण करून तें चूर्ण पंधरा पळें घ्यावें; लोहभस्म, बाळहिरडे, टाकळ्याचें बीज, चित्रकमूळ, बिब्बे, वावडिंग, खडीसाखर, आंवळकाठी, हळद, पिंपळीं, मिरे, सुंठ, बावच्याचें बीज, बाहव्याचा मगज, गोखरू, हीं पंधरा औषधें एक एक पळ घेऊन बारीक चूर्ण करावें. मग पूर्वींचें व हें अशीं दोन्हीं चूर्णें एका जागीं करून माक्याच्या रसाची भावना द्यावी; वाळल्यावर खैराचे सालीचा काढा अष्टमांश करून त्याची एक भावना देऊन बिबळ्याचे अथवा असाण्याचे सालीचा काढा अष्टमांश करून एक भावना देऊन तें चूर्ण वाळवावें. हें चूर्ण खैराची साल व असाण्याची साल या दोन्हीं सालींचे काढ्यांत अथवा तुपांत किंवा दुधांत एक कर्ष प्रमाण घालून घेतलें असतां एक महिन्यानें सारीं कुष्टें जातात. याला पंचानिंब चूर्ण म्हणतात. हें सर्व रोगांचा नाश करितें, व रसायन ( रसादि धातु ) उत्पन्न करणारें आहे.

९ **सर्वप्रकारच्या कुष्ठांस**—शक्त्यनुसार निंबाच्या पानांचा रस पाणी घालून वांटून काढून ३ ते ५ तोळे पिऊन नंतर तूप घालून पेज प्यावी, व नुसत्या तूपभाताचें पथ्य करावें. दि. २१। ३०।४२ उत्तम गुण येतो.

१० रोज निंबाचीं १० पानें पाणी घालून कल्क अथवा कडू-निंबाची पानें आंवळकाठीं, अथवा वावडिंगें, अथवा रानबांवच्या घालून कल्क सेवन केल्यास व पथ्यास तूपभात घेतल्यास सर्व कुष्ठें जातात. रोज सकाळीं एक वेळ. दि. ४२ सोसेल तसा खावा. आंवळकाठी वगैरेची मात्रा अर्ध तोळा ध्यावी.

११ **कंडुघ्न महाकषायः**—चंदन, जटामांसी, करंजसाल, निंब, कारळे, कुडा, शिरस ज्येष्ठमध, दारुहळद, नागरमोथे, यांचा काढा कंडूनाशक आहे. रक्तशुद्धि करणारा आहे.

१२ ब्रह्मचर्यानें राहून कडूनिंबाच्या पंचांगाचें चूर्ण खैराच्या सालीच्या काढ्यांतून सोसेल तसें ध्यावें. सर्व कुष्टें जाऊन देह शुद्ध होतो. दि. २१।४२.

१३ **दद्रु व गजकर्ण यांस**—नुस्ता गूळ चोळावा व नंतर खाजवून निंबाचा पाला किंवा चिंचेचा पाला चोळावा. म्हणजे दद्रु नष्ट होतो. दि. ३।७.

१४ **सर्वप्रकारच्या रक्तविकारांस**—कडूनिंबाच्या फुलांचा रस २। तोळे द्यावा. दि. २१.

## १६ केस काळे होण्यास.

१ कडूनिंबाच्या बिया सोलून त्यांस माक्याच्या रसाचीं व असा-ण्याच्या काढ्याचीं सातसात पुटें देऊन त्यांचें तेल काढून दररोज नस्य १ महिना केल्यास केसांचा पांढरेपणा समूळ जाऊन ते काळे-भोर होतात. पथ्यः—दूधभात, वरण, भाकरी.

२ कडूनिंबाच्या बियांच्या नुसत्या तेलानेंही नस्य केल्यास के. काळे होतात. पण उशीरानें होतात. पथ्य:—वरीलप्रमाणें.

३ कडूनिंबाचीं पानें, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, माका, लोह चूर्ण, हीं मेंढाच्या मुतांत खलून रात्रीं केसांस लावून सकाळीं धुवावें केस काळे होतात. दि. १४।२१.

४ कडूनिंबाच्या बियांच्या तेलास माक्याच्या रसाचीं व असनाच्या सालीच्या अष्टमांश काढ्याचीं ७ पुटें देऊन ( अथवा बियांसच पुटें देऊन तेल काढून ) त्याचें नस्य १ महिना रात्रीं करून दूधभाताचें ( गाईच्या ) पथ्य केल्यास पांढऱ्या केसांचे काळे केस होतात.

## १७ कृमिरोग.

१ **पोटांतील कृमि व बाह्य कृमि मरण्यास:**—जंतास कडूनिंबाच्या पाल्याचा रस वयोमानाप्रमाणें दोन ते आठ तोळे पाजावा व बाह्यकृमींस बियांचें तेल अंगास लावावें.

२ जंतांस कडूनिंबाच्या पाल्याचा फांट, वावडिंग व ओव्याचें चूर्ण घालून पाजावा. तांबडे जंत पडतात.

३ दोहींकडून पडणाऱ्या जंतांस कडूनिंब, खैर, कुडा यांच्या साली १, १ तोळा, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, नळीतेंड, हीं पावपाव तोळा घेऊन अष्टमांश काढा करून गोमूत्र घालून पाजावा. अनेक कृमि नाश पावतात.

४ **जंत पडून शौचास साफ होणेस:**—कडूनिंबाच्या पाल्याचा रस १ तोळा, ह्यांत वावडिंग व पळसाच्या बियांचें चूर्ण १॥ मासा भार घालून मधांतून चाटवावें. थोर माणसास ५–६ मासेभार चूर्ण घालून निंबाचा रस ५ तोळे पाजावा.

५ कडूनिंबाची अंतरसाल १ तोळा, अजमोदा, वावडिंग,

पळसाचें बीं, चोरओवा, प्रत्येकीं पावपाव तोळा वांटून गुळांत कालवून द्यावें. मुलांस वय पाहून पाव किंवा निम्मे द्यावें. तत्काळ जंतांचा नाश होतो.

६ **वीस प्रकारच्या कसल्याही जंतांस**:—कडूनिंबाच्या पाल्याच्या रसांत अस्सल हिंग २ गुंजा भार घालून पाजावें.

७ निंबाची साल कुड्याचीसाल, वावडिंग, सैंधव, हिंग, ओवा, यांस निंब—षट्क म्हणतात, यांचें चूर्ण मधांतून द्यावें. म्हणजे सर्वप्रकारच्या जंतूंचा नाश होतो, हें प्रसिद्ध आहे.

८ **दुसरें चूर्ण:**—निंबाची साल, अजमोदा, वावडिंग, पळसाचें बीं ( पळसपापडी ), चोरओवा, हिंग यांचें वस्त्रगाळ चूर्ण गुळांतून खावें; म्हणजे सर्व कृमींचा तात्काळ नाश होतो.

९ **जंतावर:**—कडूनिंबाच्या पानांचा रस किंवा काढा दिला असतां जंत पडतात. त्यांत हिंग किंवा ओवा घालून दिल्यास उत्तम गुण येतो.

१० कडूनिंबसाल, खैर, कुडा, वेखंड, मिरें, पिंपळी, त्रिफळा, ह्यांचें चूर्ण किंवा काढा गोमूत्र घालून प्यावा; सर्व प्रकारचे जंत व कृमि नाश पावतात.

११ निंबाचीसाल, कुडा, वावडिंग, हिंग ह्यांचें चूर्ण मधांतून चाटल्यास जंत नाश पावतात.

## १८ खरूज, खांडकें, दद्रु.

१ कडूनिंबाचीं पानें घेऊन त्याचा पाणी घालून वांटून रस ८ तोळे, पांढऱ्या मोहऱ्यांचें तेल २ तोळे, रुईचें दूध, तांबड्या कण्हेरीची मुळी, दंतीमूळ, मिरे यांचा कल्क १।१ तोळे घेऊन सर्व एकत्र करून कढवून तेल उरलें म्हणजे गाळून ठेवून लावून चोळलें म्हणजे खरूज गजकर्ण, खांडकें, दद्रू हीं जातात. दि. ३।५।७.

## १९ गंडमाळा.

१ गंडमाळा, गळवें, करटें किंवा नार्डीव्रण पिकून फुटून पू वाह त्यास—साबणानें स्वच्छ धुवून जखमेस कडूनिंबाच्या बियांच्या तेल कापूस भिजवून घडी किंवा वात ठेवून बांधावें, लौकर बरी हो व्रण रुजून येतो.

२ शिरस, कडूनिंबाचा पाला, बिब्बे, समभाग वांटून एक करून गाडग्यांत घालून तोंड बंद करून गोवऱ्याची आंच देऊ काळी राख झाली म्हणजे काढून शेळीच्या मुतांत कालवून ले करावा. अपाचि व गंडमाळा जातात.

३ कडूनिंब, निर्गुंडी, पांढरी कणेर, यांच्या पानांच्या कल्कांत सिद्ध केलेलें तूप चोळावें. दि. ५।७।१४.

४ कडूनिंबपानें, शिरस, दांतीमूळ, बिब्बा, बोकडाचें मुतांत वांटून लेप करावा. अपचीरोग जातो. दि. ७.

## २० ज्वर.

१ **पाळीच्या तापास**:—कडूनिंबाची साल दोन तोळे, सुंठ, धने, प्रत्येकीं अर्धअर्धतोळा घेऊन कुटून ८० भार पाणी घालून अष्टमांश काढा करून दहा तोळे घेऊन सकाळीं चार तोळे व नंतर ३, ३ तासांनीं ३—३ तोळे दोन वेळ पाजावा. हटकून पाळीचा ताप जातो. हा योग क्विनाईनपेक्षां गुणानें श्रेष्ठ असून क्विनाईनचे दोष ( पित्त वाढणें, ऐकूं न येणें, ताप उलटणें ) यांत नाहींत. या निंबकषायानें शिवाय रक्तशुद्धि होते. दि. ३।५।७. पथ्य:—ऊन पाणी प्यावें. तेल, तिखट, आंबट वर्ज्य.

२ **जीर्णज्वरास**:—कडूनिंबाच्या फांटांत मिरपूड ८ गुंजाभार व मध एक तोळा घालून ५ तोळे फांट प्यावा. दि. ७, १४.

३ **जीर्ण विषमज्वरास**:—कडूनिंबाच्या बियांचें तेल शक्ति-

मान पाहून ५—१० थेंब घेऊन पाण्यांतून पाजावें. सकाळसंध्या-काळ दि. ३,५,७.

४ **उष्णज्वरास**:—निंबाच्या सालीचा काढा चतुर्थांश उरवून ५ तोळे घेऊन साखर घालून प्यावा. दि० ३, ५, ७.

५ **उष्णज्वरास**:—कडूनिंबाच्या पाल्याचा, पाणी घालून, रस काढून गाळून शक्तिमानाप्रमाणें ४।५ तोळे घेऊन १ तोळा मध घालून प्यावा. दि. ७. दोन्हीं वेळां.

६ **हिंवतापास**:—कडूनिंबाच्या अंतरसालीचें चूर्ण १ तोळा, कुटकी अर्धा तोळा, सुंठ, मिरें, पिंपळी हीं पावपाव तोळा; या सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण एकत्र करून त्याच्या चार पुड्या करून सकाळ-पासून २—२ तासांनीं एक एक पुडींतील चूर्ण पाण्यांत घालून प्यावें. रोज येणारें हींव, ऐकाहिक, द्वयाहिक, त्र्याहिक, चातुर्थिक हे सर्व प्रकारचे ताप दोन तीन पाळींत जातात, यांत संशय नाहीं.

७ **ज्वरानंतरच्या अशक्तपणास**:—कडूनिंबाचा अर्क अर्ध तोळाप्रमाण घेऊन चारपांच तोळे पाण्यांत साखर किंवा गूळ घालून मिसळून प्यावा व रात्रीं भोजनापूर्वीं प्यावा. दि. ७।१४।२१. हा अर्क पुष्टिकारकही आहे.

८ **विषमज्वरहर चूर्ण**:—कडूनिंबाची साल १० तोळे, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आवळकाठी प्रत्येकीं ३—३ तोळे, सैंधेलोण, पादेलोण, बीडलोण, जवखार, हे प्रत्येकीं १—१ तोळा, व ओवा ५ तोळे—या सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून ज्वराच्या दोषानुरूप अनुपान योजून अर्धा किंवा एक तोळा चूर्ण द्यावें. रात्रीं जेवणापूर्वीं द्यावें. हें विषमज्वरावर प्रशस्त आहे.

९ **विषमज्वरास धूप**:—कडूनिंबाचा वाळलेला पाला, कोष्ट, वेखंड, हिरडे, शिरस, तूप व गुग्गुळ या सर्वांच्या मिश्रणाचा धूप

रोग्याचे खोलींत दिला असतां हवा शुद्ध होऊन रोगनिवारणास मदत होते.

१० **पित्तज्वरांत शरीराचा दाह होतो त्यासः**—कडूनिंबाच्या सालीचा सुंठ घालून काढा करून ५ तोळेपर्यंत घेऊन साखर घालून घ्यावा व पाल्याचा रस अंगास चोळावा. दि. ३

११ **उष्णज्वरांस**—कडूनिंबाच्या ओल्या काड्या, कांडेचिराईत, कुटकी, यांच्या चतुर्थांश काढ्यांत मध घालून वयोमानाप्रमाणें दोन ते पांच तोळे पाजावा. दि० ३.

१२ **ज्वरमुक्त झाल्यावर प्रथम स्नान घालणें:**—कडूनिंबाचे डाहाळे स्नानाचे पाण्यांत घालून आधण येईपर्यंत तापवून विसण न घालतां कोमट झाल्यावर डाहाळे काढून टाकून त्या पाण्यानें स्नान घालून कोरड्या वस्त्रानें अंग पुसून रोग्यास जाड पांघरूण घालून निजवावें. घाम येईल तो पुसावा. याप्रमाणें एक दिवसाआड दोनतीनदां स्नान घालावें; म्हणजे आराम होईल.

१३ कडूनिंबाची साल, गुळवेल, धणे, रक्तचंदन, पद्मकाष्ट ह्यांचा अष्टमांश काढा दिल्यास सर्व प्रकारच्या ज्वरांचा नाश होऊन छातीचा बिघाड, अरुचि, ओकारी, तहान, दाह हीं जाऊन अग्नि प्रदीप्त होतो.

१४ **कफपित्तजन्य-ज्वरासः**—बाळंतनिंबाची साल, कडू पडवळ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, चिकणा गूळ, ज्येष्ठमध ह्यांचा काढा प्रशस्त आहे.

१५ **एकाहिक व द्व्याहिक ज्वरास:**—निंबसाल, त्रिफळा, कडू पडवळ, कुड्याची साल, नागरमोथे, मनुका ह्यांचा काढानिकाढा द्यावा; चांगला गुणकारी आहे.

१६ **निंबादिचूर्णः**—कडूनिंबाचीं पानें १० तो. हिरडा १ तो. बेहेडा १ तो. आंवळकाठी १ तो. सुंठ १ तो. मिरे

१ तो. पिंपळी १ तो. अजमोदा १ तो. सैंधव १ तो. साधें मीठ. १ तो. जवखार २ तो. या सर्वांचें वस्त्रगाळ केलेलें चूर्ण वयोमानाप्रमाणें एक तोळ्यापर्यंत घेऊन सकाळीं ताकांतून किंवा पाण्यांतून प्यावें. म्हणजे सतत, संतत, ऐक्याहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, धातुगत ज्वर, त्रिदोषोत्पन्नज्वर हेही जातात दि. ७,१०,१४.

१७ कडूनिंबाचीं कोवळीं पानें किंवा पळस किंवा बोरीचीं कोवळीं पानें ताकांत वाटून अंगास लेप केल्यास दाहयुक्त पित्तज्वर जातो.

१८ **अष्टादशांगक्वाथः**—कडूनिंबसाल, गुळवेल, काकडशिंगी, मनुका, कचोरा, नागरमोथे, रक्तचंदन, सुंठ, कुटकी, पहाडमूळ, धमासा, काडेचिराईत, धने, वाळा, कमळ, काळा वाळा, पोखरमूळ, रिंगणीमूळ, यांचा काढा—निकाढा घेतला असतां जीर्णज्वर, अरुचि, दमा, खोकला, सूज हीं जातात. दि. ५।७।१४.

१९ **दुर्जलजनित ज्वरः**—कडूनिंब, काडेचिराईत, नळीतेड, नागरमोथे, पिंपळी, वावडिंग, सुंठ कुटकी, ह्यांचा काढा मध घालून प्यावा; म्हणजे दुर्जलजनित—ज्वराचा तत्काळ नाश होतो.

२० **संपूर्ण सान्निपातज्वरांसः**—( वात—प्रकरणांत बत्तिशी काढा लिहिला आहे तो पाहावा. )

२१ **ज्वरातिसारासः**—कडूनिंबाचीं पानें, गुळवेल, कुड्याची साल, नागरमोथे, काडेचिराईत, सुंठ, अतिविष यांचा काढा ज्वरातिसारास उत्तम आहे.

२२. कडूनिंबाची साल, काडेचिराईत, पिंपळी, कचोरा, सुंठ, शतावरीच्या मुळ्या, गुळवेल, डोरलीमूळ यांचा काढा कफज्वराचा नाश करितो.

२३. चंदनाचें गंध, निंबाच्या पानांच्या रसाचा फेस, बोरीचीं पानें हीं एकत्र वाटून पायांच्या तळव्यांस लेप करावा; रुग्दाह व सन्निपात यांचा नाश होतो.

२४ **संन्निपातज्वरांत बेशुद्ध झाल्यास**:—कडूनिंबाची साल, दारूहळद, नागरमोथे, कुटकी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, रिंगणीमूळ, कडूपडवळ, हळकुंड यांचा काढा पाजावा. सन्निपात होऊन बेशुद्ध झालेल्या मनुष्यास शुद्धि येते.

२५ **लघु-सुदर्शनचूर्ण-सर्वज्वरांस**:—कडूनिंबाची साल, गुळवेल, पिंपळमोड, पिंपळी, कुटकी, हिरडेदळ, सुंट, लवंगा, रक्तचंदन हे सर्व जिन्नस समभाग व या सर्वांच्या एकत्र वजनाइतकें काडेचिराइत घेऊन सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करावें. हें चूर्ण ऊन पाण्यांतून १ तो० द्यावें. त्रिदोष व सर्वप्रकारचे ज्वर जातात दि० ७ सकाळ-संध्याकाळ.

२६ **दुर्जल-जनित-ज्वरास**:—निंबाचीं पानें, हिरडेदळ, सुंठ, सैंधव, चित्रक यांचें चूर्ण १ तोळा ऊन पाण्यांतून द्यावें. दि० ७ सकाळ-संध्याकाळ.

२७ **उटणें**:—कडूनिंबाचीं पानें, कमळाचें मूळ, लोध, आंवळकाठी, आणि डाळिंबाच्या फळावरील साल हीं समभाग घेऊन पाण्यांत बारीक वांटून त्यांचें शरीरास उटणें लावून नंतर स्नान केलें असतां उष्णकाळांत घाम फार येणार नाहीं.

२८ **सर्वज्वरांस**:—कडूनिंबाची साल, काडेचिराईत, पिंपळी, कचोरा, सुंठ, शतावरी, गुळवेल, रिंगणीमूळ या ८ औषधांच्या काढ्यानें कफज्वर जातो.

२९ **सर्वप्रकारच्या ज्वरांस**:—कडूनिंबाची साल, गुळवेल, रक्तचंदन, पद्मकाष्ट, ह्या ५ औषधांचा काढा दिला असतां सारे ज्वर जातात. हा काढा दीपन-पाचन असून दाह, लाळ गळणें, तहान, ओकारी, अरुचि हीं जातात.

३० **पित्तकफज्वरांस**:—कडूनिंबाची साल, गुळवेल, कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, कडूपडवळ, रक्तचंदन यांचा

काढा पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा. पित्तकफज्वर, ओकारी, अरुचि, लाळ गळणें, दाह, तहान हीं जातात.

३१ कडूनिंबाची साल, कडूपडवळ, त्रिफळा, मनुका, बाहव्याच्या शेंगांतला मगज, आडुळसा या ८ जिनसांचा काढा मधसाखर घालून पाजावा. रोज येणारा ज्वर जातो.

३२ **तीव्र पित्तज्वरासः**—निंबसाल, कायफळ, इंद्रजव, कुटकी, नागरमोथे यांचा काढा द्यावा. हा काढा दाहवे दिवशीं द्यावा.

३३ **धूपः**—गुग्गुळ, रोहिषगवताचे तुरे, वेखंड, राळ, निंबाचीं वाळलेलीं पानें, रुईचें मूळ, देवदार, यांचें चूर्ण करून, त्याच्या तुपांत गोळ्या करून त्याचा धूप दिला असतां सर्वप्रकारचा ज्वर जातो.

३४ **भयंकर कफज्वर**—कडूनिंबाची साल, कुटकी, अतिविष, सुंठ, मिरें, पिंपळी, इंद्रजव. यांचा काढानिकाढा घ्याल्यास भयंकर कफज्वर जातो. दि. ३।७.

३५ **भयंकर हारिद्रक सन्निपातास**—कडूनिंबाची साल, त्रायमाण, ज्येष्ठमध, नागरमोथे, अडुळसा, गुळवेल, काडेचिराईत, यांचा काढा अष्टमांश करून थंड झालेवर मध घालून प्यावा. हारिद्रकसन्निपात लौकर जातो. दोहीं वेळां काढानिकाढा द्यावा. दि. ३।७.

३६ **साध्या पित्तज्वरास**—कडूनिंबाची साल, मनुका, कुटकी, ज्येष्ठमध, यांचा काढा निवाल्यावर पाजावा. दि. ३.

३७ सर्व विषमज्वर, एकाहिक, द्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक सतत, संतत, धातुगत, सर्वांस उत्तम औषध—कडूनिंबाचीं पानें १० भाग, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, हीं १।१ भाग व ओवा ५ भाग, सैंधव व बीडलोण, १।१ भाग जवखार २ भाग सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें. हें रोज सकाळीं १ तोळ

चूर्ण मध किंवा ऊन पाण्यांतून घेतल्यास वरील सर्व रोग जातात. दि. ३।५।७ पथ्य नाहीं ऊन पाणी प्यावें.

## २१ तृषारोग.

१ तृषारोग—कडूनिंबाच्या फुलांचा किंवा सालीचा काढा पाजून वमन करवावें. कफज वांति राहते.

२ निंबाचीं पानें, गुळवेल, सुंठ, नागरमोथे, धने, तांबडा चंदन ह्यांचा काढानिकाढा घेतला असतां वात, पित्त व कफज्वर, अरुचि, पडसें, तहान, शोष, दाह हे रोग जातात दि. ३।७.

## २२ त्वग्रोग व कुष्ठ.

१ **पुरुषांच्या किंवा स्त्रियांच्या कोणत्याही त्वग्रोगांसः**— कडूनिंबाच्या पाल्याचा रस वय व शक्तिमानाप्रमाणें ५ तों. पर्यंत घ्यावा. ( नुसत्या पाल्याचा रस निघत नाहीं; पाणी घालून वांटून वस्त्रांत गाळून काढावा. ) यानें त्वचा-रोग जातात व नवीन होत नाहीत. प्रथम प्रथम कडूरस घेतांना अवघड जातें; परंतु संवयीनें वाटत नाहीं. रोज सकाळीं १ वेळ घ्यावा; दि. ७।१४।२१.

२ **गजकर्ण, इसब, खरूज, पेण, कंडू, यांसः**--कडूनिंबाचा पाला वांटून दहीं व हळद कालवून कल्हई नसलेल्या भांड्यांत ठेवून रोज दहीं घालून कालवून रात्रीं लेप देऊन दुसऱ्या दिवशीं साबणानें धुवावें. दि. ७, १४, २१.

३ **त्वग्रोग, उपदंश, कुष्ठ यांसः**—कडूनिंबाच्या बियांचें तेल आठ दहा थेंबपर्यंत साखरेंत घालून खावें; अगर पाण्यांतून प्यावें सकाळ—संध्याकाळ. दि. ७, १४, २१.

४ **नायटे, इसब, गजकर्ण, लूत यांसः**—रोज निंबाच्या बियांच्या तेलांत हळद व कापूर खलून लेप द्यावा.

५ **संपूर्ण त्वग्रोगांसः**—कडूनिंबाच्या बियांच्या तेलासारखें

दुसरें औषध नाहीं. पोटांत घेणें व वर लावणें तें रोगाच्या महत्त्वा-प्रमाणें अनुपान योजून उपयोग करावा.

६ **कुष्ठनाशक काढा**:—कडूनिंबाचीं पानें ४ तो. आंवळ-काठी अर्ध तोळा, वावडिंग अर्ध तोळा, रानबांवच्या पाव तोळा, हीं सर्व चेंचून अष्टमांश काढा दहा तोळे करून सकाळसंध्याकाळ ५-५ तोळे घ्यावा. दि. २१. सर्व कुष्ठ जातात.

७ **सर्व-कुष्ठ-नाशक-पंचनिंबादि चूर्ण**:—कडूनिंबाचीं पानें फुलें, फळें, साल, मूळ यांचें समभाग चूर्ण वस्त्रगाळ करून त्यास खैर व असाणा यांच्या अष्टमांश काढ्याचीं तीन पुटें देऊन सावलींत वाळवावें. नंतर त्यांत चित्रकमूळ, वावडिंग, बाहव्याच्या शेंगेचा मगज, खडीसाखर, बिब्बे, हिरडे, सुंठ, आंवळकाठी, सराटे, टाकळ्याचें बी, रानबाबच्या, पिंपळी, मिरें, हळद यांच्या सम-भाग चूर्णाला माक्याच्या रसाची भावना देऊन सावलींत वाळवून वर सांगितलेल्या पंचनिंबांच्या चूर्णांत अर्धभाग हें चूर्ण मिसळून व लोहभस्म निम्में मिसळून ठेवावें, व रोज सकाळीं दुधांतून किंवा खैर-असाण्याच्या काढ्यांतून सकाळ-संध्याकाळ १-१ तोळा घ्यावें. यास पथ्य नाहीं. हें एक महिना घेतलें असतां सर्व त्वचेचे रोग, नालिका ( तीळ ) वांग, तिलकालक, १८ हीं कुष्ठें, ७ प्रकारचा क्षय यांचाही नाश होतो. हें रसायन आहे. याच्या सेव-नानें मनुष्य सर्वव्याधींपासून मुक्त होतो.

८ **कुष्ठादिकांवर पंचतिक्तघृत**:—कडूनिंबाची साल कडूपड-वळ; रिंगणीमूळ, गुळवेल, अडोळशाचें मूळ हीं औषधें प्रत्येकीं ४० तो. घेऊन साधारण कुटून १०२४ तो. पाणी घालून चतुर्थांश काढा करून गाळून घेऊन त्यांत १६ तो. त्रिफळ्याचा कल्क व ६४ तो. तूप घालून पुन्हां कढवून फक्त तूप उरलें म्हणजे गाळून घेऊन काचेच्या बरणींत ठेवून रोज सकाळ-संध्याकाळ दोन दोन

तोळे खावें; म्हणजे सर्वप्रकारचीं कुष्ठें, सर्व वातरोग, पित्तरोग, कफरोग आणि कृमि, मूळव्याध, दुष्ट व्रण यांचा नाश होतो. दि. ३०।४०।६०.

९ **तिक्तघृतः**—कडूनिंब-साल, हिरडा, बेहेडा, आवळकाठी हळद, दारू-हळद, इंद्रजव, धमासा, पित्तपापडा, कडू पडवळ, कुटकी, त्रायमाण हीं प्रत्येकीं ८—८ तो. घेऊन १०२४ तो. पाणी घालून चतुर्थांश करून गाळून घेऊन त्यांत पिंपळी, नागरमोथे; इंद्रजव, चंदन, त्रायमाण, काडेचिराईत यांचें चूर्ण प्रत्येकीं २—२ तो. व तूप ६४ तोळे घालून कढवून तूप उरलें म्हणजे गाळून कांचेच्या बरणींत ठेवावें. हें दररोज सकाळ-संध्याकाळ १॥—२ तोळे घ्यावें; म्हणजे कुष्ठ, ज्वर, मूळव्याध, सूज, संग्रहणी, पांडुरोग यांचा नाश होतो. दि. ७।३०।४०. रोगमानाप्रमाणें पथ्यः— त्या त्या रोगावरील.

१० **खरजेसः**—कडूनिंबाचा वाळलेला पाला जाळून राख करंजेलांत खलून लावावी; ओली खरूज जाते. वाळलेल्या कंडूयुक्त खरजेस निंबाच्या पाल्याच्या रसांत हळद घालून रात्रीं लावून सकाळीं साबण लावून स्नान करावें.

११ **खरजेसः**—कडूनिंबाच्या बिया वांटून लावून २ तासांनीं स्नान करावें. दिवस ३,५,७.

**१२ पित्तामुळें अंगास गांधी उठून कंडू सुटतां त्यासः—** निंबाच्या पाल्याचा रस कापूर घालून लावावा.

१३ कडूनिंबाची साल, खैराची साल, त्रिशोष धूप, देवदार, धावडा, वावडिंग, कण्हेरीच्या मुळ्या ह्यांचा कल्क शिरसाच्या तेलांत ( पांढऱ्या मोहरीचें तेल ) खलून लेप केल्यास कष्टसाध्य कुष्ठें नवीन किलास कुष्ठ, चाई, किरिभ कुष्ठ, दद्रु, भगंदर, मूळव्याध व खरूज हीं जातात.

१४ हिरडेदळ १ भाग, कडूनिंबाचीं पानें ३ भाग ह्यांचा कल्क पाण्यांत वांटून किंवा आवळकाठी १ भाग, निंबाचा पाला २ भाग यांचा कल्क मधांतून किंवा पाण्यांतून सकाळ—संध्याकाळ वयोमानाप्रमाणें १ ते २ तोळे घ्यावा. दिवस ७।१४।२१।३०. ह्यानें सर्वप्रकारचीं कुष्ठें नाश पावतात.

१५ कडूनिंबाची साल, सुंठ, मिरें, पिंपळी, कडूपडवळ, गुळवेल, अडूळशाचीं पानें या ८ औषधांचा काढा, कुष्ठ, कंडू व फोड ह्यांचा नाश करितो.

१६ **कुष्ठ ( पांढऱ्या कोडास ) उत्तम लेपः**—कडूनिंबाची साल, गुंज, कोष्ट, वेखंड, पांढऱ्या गोकर्णीचें मूळ, हीं सर्व पाण्यांत उगाळून लेप करावा. कोड ( पांढरें ) हटकून जातें. दि. १४।२१.

१७ **कुष्ठांसः**—कडूनिंबाची साल व कडूपडवळीचीं पानें यांचा काढानिकाढा प्याल्यास कोड जातें. दि. ३२.

१८ कडूनिंबाची साल, पानें, फुलें, फळें, मुळें जमवून वाळवून चूर्ण करून ठेवावें. ११ भाग व हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, हीं प्रत्येकीं ११ भाग घेऊन सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून मिळवून ठेवावें. त्यापैकीं १ तोळा चूर्ण, दूध, मध, तूप यांतून घेतल्यास खोकला, विष, कुष्ठें, प्रमेहपीटिका हे रोग जातात. दि. ७ १४।२१ दोन्हीं वेळां.

१९. कडूनिंबाची साल, करंजाचें बीं, एरंडबीज, गुळवेल, रानबावच्या, कोष्ट, हरताळ, मिरें, नागरमोथे, यांचें चूर्ण, गोमूत्र सांटून राहिलेल्या जागेंतील गाळ सर्व एकत्र वांटून त्याचा लेप केल्यास सर्वच कुष्ठें जातात. दि. ७।१४।२१ रोज साबणानें धुवावें.

## २३ दन्तरोग.

१ **दंतधावनः**—कडूनिंबाची चार—सहा बोटें लांब काडी घेवून तिची एक बाजू दगडानें ठेंचून बोथट करून तिनें दांत घास-

स्याम दातांतील व हिरड्यांतील कीड मरून दांत स्वच्छ व बळकट होतात.

२ कडूनिंबाचीं व वडाचीं वाळलेलीं पानें जाळून वस्त्रगाळ पूड करून तिच्यांत बारीक मीठ मिसळून त्यानें दररोज दांत घासावे व तोंड धुवावें. हें चूर्ण दन्तरोगास फार प्रशस्त आहे.

३ कडूनिंबाचा पाला, वावडिंग, नागरमोथे, हिरडेदळ, सुंठ, मिरें, पिंपळी याचें वस्त्रगाळ चूर्ण करून गोमूत्रांत खलून, गजग्या- एवढ्या गोळ्या करून सावलींत वाळवून ठेवाव्यात व निजतेवेळीं एक गोळी तोंडांत धरून निजावें. हलणारे दांत बळकट होतात. या सारखें दुसरें औषध नाहीं.

४ **दांत बळकट होण्यास**—हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, कडूनिंबाची साल हीं सर्व वाटून रात्रीं पाण्यांत भिजत घालून त्याचा पाण्यानें सकाळीं तोंड व दांत धुवावे; म्हणजे दांत बळकट होतात.

## २४ दाहरोग.

१ कडूनिंबाची साल, कडू पडवळ, गुळवेल, कुटकी ह्यांचा काढा प्याल्यास ज्वर, दाह, अरुचि, अग्नि—मांद्य, आमशूळ, ओकारी, हीं जातात.

२ निंबाचीं व बोरीचीं पानें कांजींत किंवा ताकांत वांटून पुन्हां कांजींत किंवा ताकांत घुसळून त्याचा फेस अंगास लावावा म्हणजे दाह शांत होऊन बरें वाटतें.

३ हिरडा, बेहेडा, आंवळाकाठी, कडूनिंबाची साल, ज्येष्ठमध कुटकी, बाहव्याच्या शेंगेंतील मगज ह्यांचा काढा प्याल्यास दाह व शूळ यांचा नाश होतो.

४ बाळंतलिंबाच्या पाल्याचा रस काढून घुसळून त्याच्या फेसाचा लेप अंगास केल्यास दाह, मोह व तहान हे रोग जातात.

५ कडूनिंबाची साल, गुळवेल, कुटकी, कडूपडवळ, नागरमोथे,

चंदन, सुंठ, इंद्रजव, ह्यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून घेतल्यास पित्त, कफज्वर, दाह, तृषा, ओकारी हीं जातात.

६ खैरसाल ( कात ), त्रिफळा, कडूनिंबाची साल, कुटकी, ज्येष्ठमध, हीं १।१ भाग व निशोत्तर, कडूपडवळ मूळ, ४।४ भाग ह्यांचा काढा करून पिण्यास दिला असतां व्रण, विद्रधी, गुल्म, विसर्प, दाह, मोह, ज्वर, तृषा, मूर्च्छा, वांति, हृद्रोग, रक्तपित्त, कुष्ठ, कार्माण, हीं जातात. दि. ३।७।१२

## २५ धूप.

१ **ग्रहबाधा-निवारण धूपः**—कडूनिंबाचा वाळलेला पाला, शिरस, भूजपत्र, वेखंड, जुनें तूप घोड्याच्या नख्या ह्यांचें चूर्ण करून तुपांत कालवून धुरी द्यावी.

२ देवी, गोवर, ज्वर यांच्या भागांतील हवा शुद्ध करणारा धूपः—निंब, बेल, अडुळसा, देवकापशी यांचा पाला, तुळस, आघाडा ह्यांचे वाळलेले पाले, सरकया, वेखंड या सर्वांचें चूर्ण करून तुपांत कालवून धुरी द्यावी; म्हणजे हवा शुद्ध होऊन रोगजंतू नाश पावतात.

३ **विषमज्वरास धूपः**—निंबसाल, गुग्गुळ, वेखंड, कोष्ट, हिरडा, शिरस ( मोहऱ्या ), सातू हे जिन्नस अर्धवट कुटून, तुपाचा हात देऊन, त्यांची धुरी सर्वांगास द्यावी; म्हणजे ज्वर-जंतूंचा नाश होतो. हा विषमज्वरास प्रशस्त आहे.

## २६ नखुरडें.

१ **नखुरडें व बोटाचे पेरासः**—निंबाचा पाला थोडें मीठ घालून बारीक वांटून, ऊन करून, तुपांत कालवून सोसेल तसा ऊन ऊन बांधावा.

## २७ नारू.

१ **नारूस**:—कडूनिंबाचीं व निर्गुडीचीं पानें समभाग घेऊन बारीक वांटून, रस काढून, तो गाळून व तूप २ तो. घालून ध्यावा. सकाळ—संध्याकाळ दिवस ३. नारू जोर न करतां मरतो.

२ कडूनिंबाचा पाला हिंग घालून बारीक वांटून बांधावा व वरील फडकें ओलें राखावें. दि. ३.

## २८ नेत्र–रोग.

१ कडूनिंबाचीं पानें, हळद, सुंठ, मिरें, पिंपळी, नागरमोथ, वावडिंग, हीं सात औषधें घेऊन गोमूत्रांत उत्तम खल करून खारकेच्या बीप्रमाणें लांबट गोळ्या करून सावलींत वाळवून कांचेच्या कुपींत ठेवाव्या व प्रसंगीं पाण्यांत उगाळून अंजन केल्यास तिमिरनेत्ररोग जातो; मधांतून केल्यास पटल रोग जातो; शेंधेलोणाच्या पाण्यांतून केल्यास कंडू नेत्र-रोग जातो; स्त्रीच्या दुधांत उगाळून अंजन केल्यास अभिष्यंद नेत्र—रोग जातो; ( आलेले डोळे बरे होतात. ) चिपडें जाण्यास पळसाच्या फुलांच्या रसांतून अंजन करावें.

२ **नकुलांधास**:—कडूनिंब, हळद, अडूळसा, वेखंड, तेड, रक्तचंदन, गुळवेल, काडेचिराईत हीं औषधें एक एक तोळा घेऊन अष्टमांश काढा करून व रात्रीं निकाढा करून ध्यावा. जुनाट नकुलांधही जातें. दि. ७।१४.

३ **पित्ताभिष्पंदावर सेकः**—निंबाचीं-पानें, रक्तचंदन, ज्येष्ठ-मध, दारूहळद, सैंधव हीं सर्व वांटून त्यांच्या कल्कांत मध घालून डोळ्यांवर सेक द्यावा.

४ डोळ्याची सूज, ठणका, कंडू यांसः—सुंठ, कडूनिंबाचीं पानें, सैंधव हीं सर्व एकत्र वांटून डोळ्यांवर बांधावीत. दि- ३.

५ **वायूपासून व रक्तपित्तापासून झालेल्या अभिष्यंदास**:—कडूनिंबाचीं पानें पाण्यांत वांटून लोध्राच्या सालीला त्याचा लेप

करून विस्तवावर ऊन करून सालीसह वांटून रस काढून त्या रसाचे डोळयांमध्यें बिंदू सोडावे. म्हणजे वातजन्य, रक्तपित्तजन्य अभिष्यंद जातो.

६ **सर्व नेत्ररोगांसः**—कडूनिंब, अडुळसा, सुंठ, गुळवेल, दारुहळद, रक्तचंदन, चित्रक, किराईत, कुटकी, कडूपडवळ, त्रिफळा, नागरमोथे, जव, इंद्रजव, कुड्याची साल, या १७ जिनसांचा काढा घ्यावा. सर्व नेत्ररोग, स्वरभंग, पडसें, श्वास, उरःक्षत, हे रोग जातात.

७ निंबाचीं पानें, हळद, पिंपळी, मिरे, वावडिंग, नागरमोथे, हिरडा, सर्व समान चूर्ण करून बकरीच्या दुधांत खलून वातीप्रमाणें गोळ्या करून ठेवाव्या. पाण्यांत उगाळून अंजन केल्यास तिमिररोग जातो. गोमूत्रांतून अंजन केल्यास, पिष्टक रोग जातो, मधांतून अंजन केल्यास पटल जातें, व स्त्रीदुधांत उगाळून अंजन केल्यास फूल जातें. दि. ३।७।१४.

८ **डोळ्यांतील फुलासः**—आवळकाठी, कडूनिंबाचीं व कवठाचीं पानें, ज्येष्ठमध, लोध, खैरकात, तीळ, यांचा काढा थंड करून रात्रीं डोळ्यांत ४ थेंब सोडावे; फूल जातें. दि. ७।१४।२१.

९ **सर्व नेत्ररोगांस व मस्तकरोगांस उत्तम उपायः**—हिरडा, बेहडा, आवळकाठी, हळद, गुळवेल, काडेचिराईत, कडूनिंबसाल, सर्व समान भाग घेऊन अष्टमांश काढा करून घेतल्यास, डोळ्यांत कांहीं औषध न घालतांच रातांधळे, सूर्यावर्त, काचबिंदु, शुक्र, पटल, नेत्रपाक, अश्रुस्राव, तिमिर, पक्ष्मप्रकोपादि शिरोरोग, इतर नेत्ररोग व अर्धशिशि हे सर्व रोग नष्ट होतात.

१० कडूनिंबाचीं पानें व लोध बारीक वांटून ओल्या फडक्यांत घालून पोटळी बांधून डोळ्यांत थेंब सोडले असतां अक्षिपाक नेत्ररोग जातो. दि. ३.

११ निंब, औदुंबर, यांच्या साली, एरंडाचे मुळाची साल, ज्येष्ठ-मध, चंदन, यांच्या चूर्णाची फडक्यांत पोटळी बांधून नेत्रावर फिरवावी. कसल्याही प्रकारचे नेत्ररोग अभिष्यंद ( आलेले डोळे बरे होतात. ) दि. ३.

## २९ पटकी.

१ कडूनिंबाच्या पाल्याचा फांट करून त्यांत उत्तम हिंग दर खेपेस १-१॥ गुंजभार-घालून ५-५ तो. प्रमाणें फांट १-१ तासाचे अंतरानें पाजावा. असें २-३ वेळां पाजल्यास ढाळ, वांति बंद होते. नंतर पाजण्याचें कारण नाहीं.

२ कडूनिंबाची साल, करंजाच्या झाडाची साल, अघाड्याचें बीं, गुळवेल, आजवलाचें मूळ, इंद्रजव यांचा काढा दिल्यास ओकारी होऊन अजीर्णापासून झालेली विषूचिका जाते.

**३ पटकीवरः**—पुदीना पानें १ तोळा, बडीशेप १ तोळा, कडूनिंबाच्या बिया मोजून ६, वेलदोडे ६, पाणी ८० तोळे यांचा काढा निमा आटवून गाळून दरतासानें २।२ चमचे पाजावें; तहान हटकून रहाते.

**४ पटकीवरः**—करंजसाल, निंब, चिरचिटा, गुळवेल, तुळस, कुडा यांचा काढा दर तासानें थोडाथोडा पाजावा. भयंकर विषूचिका राहते.

## ३० पांडुरोग.

१ कडूनिंबाची साल, गुळवेल, अडुळसा, कुटकी, काडेचिराईत, त्रिफळा यांचा काढानिकाढा मध घालून द्यावा; दि. ७।१४. कामलेसह पांडुरोगाचा नाश होतो.

## ३१ पित्त.

**१ पित्तासः**—कडूनिंबाच्या काड्या ३, सुंठ १, धणे १, खडीसाखर १ या प्रमाणांत घेऊन साधारण कुटून २० तो० पाणी

घालून चतुर्थांश काढा करून गूळ किंवा साखर घालून प्यावा. दि. ३.

२ **पित्त पडणेस:**—कडूनिंबाचा पाला पाणी घालून वांटून गाळून पोटभर रस पाजावा. वांती होऊन पित्त पडतें.

३ कडूनिंबाची साल, कडू पडवळ, हिरडा, बेहेडा, आवळकाठी यांचा काढा मध घालून दिला असतां कफ, ज्वर, ओकारी व त्वचेचे विकार जातात.

## ३२ प्रमेह ( परमा ).

१ **परम्यास:**—कडूनिंबाचीं कोंवळीं फळें, आवळकाठी हीं घेऊन अष्टमांश काढा करून निवाल्यावर हळद व मध घालून प्यावा. दिवस ७।१४ सर्वप्रकारचा परमा जातो.

२ परमा झाला म्हणजे शिश्न सुजून लघवी बंद होते, त्यास:—कडूनिंबाच्या पानांचा १।२ घागरी काढा करून एका पातेल्यांत घालून रोग्यास १ तास त्यांत बसवावा व पोटांत केळीच्या सोपाचें पाणी काढून अर्धी वाटी घेऊन त्यांत तितकेंच तूप घालून पाजावें; लघवी होऊन बरें वाटतें.

३ **परमा व गरमीस:**—कडूनिंबाची व बाभळीची साल घेऊन ठेंचून रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं १० तोळे पाणी गाळून प्यावें. दिवस ७।१४.

४ **सिकतामेहास व इक्षुमेहास:**—कडूनिंबाच्या ओल्या काड्यांचा किंवा अंतरसालीचा काढा प्यावा. दिवस ७।१४.

५ कडूनिंबाची साल, कडूपडवळ, आवळकाठी, गुळवेल ह्यांच्या काढ्यांत मध घालून प्याले असतां प्रमेह जातो. दि. ७.

६ निंबसाल, अर्जुनवृक्षाची साल, नीलकमल, तिवस, ( ह्याचीं पानें बेलासारखीं त्रिदळ असतात. ) ह्यांच्या काढ्यांत मध घालून प्याल्यानें प्रमेह जातो. दि. ७।१४.

७ उदकमेह, इक्षुमेह, सुरामेह, सिकतामेह, शनैमेह, लवण-मेह, पिष्टमेह, सांद्रमेह यासः—पारिजात, जास्वंद, कडूनिंबाची साल, चित्रक, खैरसाल, पहाडमूळ, हळद, दारुहळद, ह्या आठ जिनसांचा काढनिकाढा निवाल्यावर मध घालून प्याल्यानें वरील सर्व प्रमेह जातात.

## ३३ बाल-रोग.

१ लहान मुलांच्या अंगावरील पुरळ, कोरडी खरूज, ओले फोड, डोकींतील खवडे यासः—कडूनिंबाचा पाला हळद घालून दह्यांत वांटून वाटीभर निकल्हईच्या भांड्यांत ठेवावें म्हणजे कळकतें; नंतर दर-रोज दहीं घालून कालवून रात्रीं लावून सकाळीं साबण लावून पाण्यानें धुवावें किंवा न्हावूं घालावें. म्हणजे वर लिहिलेले सर्व रोग जातात. दि. ३।५।७।१४.

२ आगपैणीसः—कडूनिंबाचा पाला, कडू कारलें, शमीचा पाला, हळद हीं वांटून दह्यांत कालवून सकाळचा लेप रात्रीं व रात्रींचा सकाळीं साबण लावून धुवावा. वरील जिनसांचा कल्क एकदांच पुष्कळ करून निकल्हईच्या भांड्यांत ठेवावा; म्हणजे प्रत्येक वेळीं खटपट करण्याचें कारण नाहीं, हें औषध पैणीस फार उत्तम आहे.

३ मुलांच्या ओकारीसः—निंबाचा रस थोडें पाणी घालून गाळून त्यांत मध घालून चमचाभर पाजावें.

४ मुलांस किंवा थोरांस अनेक त्वचेच्या रोगांस रक्त-शुद्धीकरितां निंबाच्या पाल्याचा रस साखर व हळद घालून वयोमानाप्रमाणें दोन तें पांच तोळे पाजावा. दि. ७।१४।२१.

५ मुलांस गोंवर येऊन गेल्यावरः—निंबाच्या पाल्याचा रस साखर घालून पाजावा. म्हणजे पोटांतील धग जाऊन कांति चांगली होते. दिवस ३।७.

६ देवी किंवा गोवराची सांथ गांवांत आली म्हणजे कडूनिंबाच्या पानांचा फांट वयोमानाप्रमाणें २।४ तोळे पाजावा व पाण्यांत निंबाचे डाहाळे घालून पाणी तापवून पाणी निवाल्यावर डाहाळे काढून टाकून त्या पाण्यानें न्हाऊं घालावें, म्हणजे साथीचें भय नाहीं.

**७ देवी ( मसूरिका ) हलक्या व निरुपद्रवी होणेसः**—कडूनिंब, अडूळसा व कडूपडवळ यांच्या पानांचा काढा पाजून ओकवावें. तीन पाले न मिळाल्यास दोन असले तरी हरकत नाहीं. मग १ दिवस सोडून एरंडेल किंवा बाळहिरड्याचा काढा पाजून ढाळ करवावे.

**८ पित्तजन्य, रक्तजन्य, व कफजन्य मसूरिकाः**—निंबाची साल, पित्तपापडा, पहाडमूळ, कडूपडवळ, पांढरा व तांबडा चंदन, अडुळसा, धमासा, आवळकाठी, वाळा, व कुटकी, यांचा काढा खडीसाखर घालून गोड करून वयोमानाप्रमाणें १।२ बोंडलीं पाजावा. दिवस ३.

**९ दुसरा प्रकारः**—कडूनिंबाची साल, खारीक, मनुका, शिवणीचीं फळें, कडूपडवळ, आवळकाठी, भाताच्या लाह्या, धमासा ह्यांचा काढा खडीसाखर घालून वयोमानाप्रमाणें पाजावा. दि. ३.

१० कडूनिंबाची साल, खैराची साल, कडू पडवळ, त्रिफळा, गुळवेल, अडूळसा ह्यांचा काढा दिला असतां देवी, गोंवर, कुष्ठ, विसर्प, कंडू, विस्फोट यांचा नाश होतो. दि. ४।७.

**११ खवडे, खरूज, कंडू यांसः**—कडूनिंबाच्या सालीच्या चतुर्थांश काढ्यानें धुऊन घोड्याच्या लिदीच्या रसांत शेंदेलोण व हळद खलून लेप द्यावा.

**१२ खवड्यांवर तेलः**—कडूनिंबाचा पाला, हळद, दारूहळद, काडेचिराईत, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, चंदन यांच्या कल्कांत चौपट तेल व तेलाच्या चौपट पाणी घालून कढवून तेल उरल्यावर नित्य खवड्यांस लावावें.

१३ कडूनिंब, खैरसाल, जांबूळ यांच्या साली गोमूत्रांत वांटून खवड्यांवर लेप करावा व सकाळीं स्वच्छ धुवावें.

## बालरोग-देवी.

१४ रानशेणींची राख लावावी व कडूनिंबाच्या डहाळ्यांनीं माशा हाकाव्या.

१५ देवीचा ज्वर शांत करणेस याहून दुसरें औषध नाहीं. कच्चया देवी पक्क होतात व शोधन होतें आणि दाह, ज्वर, विसर्प, व्रण यांस—कडूनिंब, कडूपडवळ, गुळवेल, नागरमोथे, अडुळसा, घमासा, किराईत, कुटकी, पित्तपापडा, यांचा फांट द्यावा.

१६ **देवीचे व्रण धुण्यास काढाः**—कडूनिंब, विष्णुक्रांत, तोंडल्याचा पाला, वेताची साल, यांच्या काढ्यानें धुवावें.

१७ कडूनिंब, खैर, त्रिफळा, ( हिरडा, बेहडा, आवळकाठी ) कडूपडवळ, गुळवेल, अडुळसा यांचा काढानिकाढा दिला असतां रोमांतिका, मसूरिका, कुष्ठ, विस्फोटक, विसर्प, खरूज, हीं सर्व नष्ट होतात. दि. ७।१४.

१८ खैरसाल, कडूनिंबाचीं पानें, उंबराच्या झाडाची साल, सिरसाची साल, हीं वांटून देवीवर लेप केल्यास पू न होतां भरून येतात.

## ३४ मस्तकरोग.

१ उन्हाचे तापानें मस्तक दुखुं लागल्यासः—कडूनिंबाच्या बियांचें तेल कापूर घालून चोळावें.

२ **शंखक-मस्तक-शूळासः**—कडूनिंबाचीं पानें, दारूहळद, मंजिष्ठ, वाळा, पद्मकाष्ठ या औषधांच्या कल्काचा लेप द्यावा. शंखक ( कानशिलेजवळच्या भागाचा ) शूळ जातो.

३ कडूनिंबाची साल, दारुहळद, मंजिष्ठ, वाळा, पद्मकाष्ट, समान घेऊन पाण्यांत वांटून उष्ण लेप केला असतां शंखकशूळ राहतो, (दोन्ही कानशिलांच्या शूळास शंखक-शूळ म्हणतात. )

## ३५ मुख-रोग.

१ कडूनिंब, कडू पडवळ, जांबूळ, आंबा, जाई यांच्या काढ्यानें तोंड धुवावें. ह्यांच्या पानांच्या काढ्यानें गुळण्या कराव्या.

२ **मुखपाकासः**—कडूनिंब, आंबा, जांबूळ, मालती, कडूपडवळ यांचीं पानें आणून त्यांचा काढा करून त्यानें वरचेवर तोंड धुवावें व गुळण्या कराव्या; उत्तम गुण येतो.

३ **मुखपाकास तेलः**—निंबाचीं पानें, हळद, ज्येष्ठमध, निळें कमळ यांचा काढा व कल्क यांत चतुर्थांश तेल घालून कढवून तेल उरलें म्हणजे त्यानें गुळण्या कराव्या. उत्तम गुण येतो.

४ कडूनिंबाची साल, नागरमोथे, सुंठ, मिरें, पिंपळी, पहाडमूळ, दालचिनी, इंद्रजव, कडूपडवळ, कुटकी, हळद, धमासा, चमेलीचीं फुलें, चिराईत, ज्येष्ठमध, रसवंत, त्रायमाण, गुळवेल, त्रिफळा, सर्व समान घेऊन चूर्ण करावें. ह्याच्या चुळा भरण्यानें व पोटांत घेण्यानें समस्त दंतरोग, गलरोग व मुखरोग जातात.

## ३६ मूळव्याध.

१ **मूळव्याधीचा मोड सुजल्यासः**—कडूनिंबाचा पाला वांटून वडी करून बसवून लंगोट घालावा; सूज कमी होते.

२ कडूनिंबाचीं कोंवळीं पानें वांटून सकाळ-संध्याकाळ मूठमूठ खावींत. दि. ७।१४ मूळव्याध जाते.

३ **मूळव्याधीचे मोड गळून पडण्यासः**—कडूनिंबाच्या बिया सोलून अर्ध गुंजभार मोर्चुदाची लाही करून खलून तें मलम लावावें, मोड गळून पडतील. आग झाल्यास धुवून काढून लोणी लावावें.

४ कडूनिंबाचीं व पिंपळाचीं पानें वांटून लेप केल्यास मोडाचीही मूळव्याध जाते. दि. ७.

## ३७ यकृत.

**यकृतास**:–कडूनिंबाचीं पानें ५ तो० घेऊन आधण आलेलें पाणी ६० तो० घालून २ तास झांकून ठेवून मग गाळून तो फांट दर वेळीं ५ तो० प्रमाणें घ्यावा; पिवळे जुलाब होऊन रोग जातो. दिवस ७।१४ रोज दोन वेळ पिणें.

## ३८ वात–रक्त ( रक्तपितास ).

१ **वातरक्तास**:—निंबाच्या पानांचा रस दररोज सकाळ–संध्याकाळ ५ ते ८ तो० घ्यावा व निंबाच्या बियांचें तेल अंगास चोळावें. उत्तम उपयोग होतो व रोग न वाढतां जातो. दि० २१।३०।४०.

२ **वातरक्त, कुष्ठ, खरूज, रक्त–मंडळें, कापालिक कुष्ठ यांचा नाश होण्यास**:—कडूनिंबाची साल, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, मंजिष्ठ, वेखंड, कुटकी, गुळवेल, दारुहळद, यांचा काढा-निकाढा घ्यावा. दि. १४।२१।३०।४०. रोगमानाप्रमाणें. पथ्य–दूध–भात.

३ **महारोग ( रक्तपिती ) यांस**:—कडूनिंबच महत्वाचें औषध आहे. कडूनिंबाच्या पाल्याचा रस शक्तिमानाप्रमाणें सकाळीं व रात्रीं जेवणाचे पूर्वी घ्यावा. कडूनिंबाचा पाला पाण्यांत कढवून त्या पाण्यानें स्नान करावें. पथ्य–गाईचें किंवा शेळीचें दूध, भात, अळणी. २।३ महिने रोगमानाप्रमाणें करावें. दुर्धर महारोगही जातो. निंबाच्या झाडाखालीं झोपडी बांधून रहावें.

४ **गलितकुष्ठावर ( वातरक्त )**:—पहाडमूळ, कडूनिंबाचा व खैराच्या पंचांगाचा काढा सकाळ–संध्याकाळ दिला असतां गलित कुष्ठाचा नाश होतो. दि. २१।४२.

५ मंजिष्ट, त्रिफळा, कडूपडवळ, कडूनिंब, दारुहळद, गुळवेल यांचा काढा निवाल्यावर मध घालून द्यावा. गलितकुष्ट जातें. दि. ४२.

६ खैरीकात, त्रिफळा, कडूनिंबसाल, कडूपडवळ, अडुळसा,

गुळवेल, यांच्या काढ्यानिकाढ्यांत मध, तूप घालून घेतल्यास वात-रक्तविकारास उत्तम आहे. यानें रक्तशुद्धि होते. काढा थंड झाल्या-वर मध घालावा. दि. ७।१४।२१।४२.

## ३९ वातरोग.

१ **आमवातामुळें सांधे दुखत असल्यासः**—निंबाच्या बियांचें तेल कापूर घालून चोळावें व तेल दरवेळीं ऊन पाण्यांतून ५।१० थेंब घ्यावें. दि. ७।१४.

२ बाळंतनिंबाचा रस किंवा काढा नाकानें प्यावा, म्हणजे आव-बाहुकाचा नाश होतो. एक महिना प्याल्यास बाहू बळकट होतात.

३ निंबसाल व चिकणामूळ यांचा काढा अवबाहुकांचा नाश करितो.

४ **संपूर्ण वातावर बत्तिशा काढा**:—कडूनिंबाची साल, भारं-गमूळ, नागरमोथे, हिरडा, गुळवेल, काडेचिराईत, अडोळसामूळ, कुटकी, त्रायमाण, अतिविष, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, टेंटूमूळ, इंद्रजव, रासना, धमासा, कडूपडवळ, पाडळमूळ, कचोरा, दारूह-ळद, कडूवृंदावन मूळ, तेड, ब्राम्ही, पोखरमूळ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, हळद, आंवळकाठी, बेहेडा, देवदार यांचा काढ निकाढा घेतला असतां सर्व जातींचा व सर्व लक्षणांनीं युक्त वातरोग, सन्निपात, दमा, खोकला, मूळव्याध, हृद्रोग, उचकी, वातविकार, मन्यास्तंभ, गलरोग, अर्दितवात, मलावष्टंभ, बद इत्यादि विकार लौकर जातात.

५ फार जुन्या कडूनिंबाच्या मुळाची साल थंड पाण्यांत वांटून गाळून प्याल्यास संधिवात जातो. दि. ७।१४।२१ सकाळ—संध्याकाळ.

६ कडूनिंब, कडूपडवळ, रिंगणीसर्वांग, गुळवेल, अडुळसा, १०।१० भाग. सर्व समान घेऊन ५० भाग पाण्यांत अष्टमांश काढा

करून गाळून त्यांत २ भाग तूप व हिरडा, बेहडा, आंवळकाठी २।२ भाग घेऊन कल्क करून घालून सर्व कढवून तूप उरलेवर गाळून ठेवावें. सकाळ-संध्याकाळ २।२ तोळे खावें. म्हणजे सर्व वातरोग, कफ, पित्त, व्रण, कृमिअंश खोकला जातो. दि. २१.

## ४० वारूळ ( वाल्मिक ) रोग.

१ कडूनिंबाच्या बियांचें तेल २ तोळे, मनशील, हरताळ, बिब्बे, पांढरा चंदन, चमेलीचीं पानें. सर्व समान १० तोळे यांचा काढा १५ तोळे सर्व एकत्र कढवून तेल उरलें म्हणजे, गाळून ठेवून हें लावल्यानें फार जुनें, फार छिद्रें असलेलें वारूळ ( वाल्मिक ) नष्ट होते. दि. ७।१४।२१.

## ४१ वांति.

१ वांति, कुष्ठ, पित्त, व जंत यांस:—कडूनिंबाच्या पाल्याचा पाणी घालून वांटून रस काढून ५ तो० पर्यंत प्यावा. दि० १; वांतीस व जंतास दि० १; पित्तास साखर घालून ३ दि०; कफास ३ दि०, कुष्ठास २ दि०; याप्रमाणें घेतला असतां तो तो रोग नाश पावतो.

२ जंतांमुळें ओकारी होत असल्यास:—कडूनिंबाच्या पाल्याचा रस वयोमानाप्रमाणें २ ते ५ तो० पाजावा. त्यांत १-२ गुंजा उत्तम हिंग भाजून घालावा.

३ आम्लपित्तजन्य ओकारीस:—कडूनिंबाची साल, कडूपडवळ, गुळवेल, चित्रक यांचा काढा मध घालून पाजावा. उत्तम गुणकारी आहे.

४ ओकारी, कुष्ठ, पित्त, जंत, कफ यांस—कडूनिंबाचीं पानें घालून वांटून तो कल्क, पातळ करून प्यावा.

५ त्रिफळा, निंबसाल, गुळवेल, कडूपडवळपानें यांच्या काढ्यांत आठवा भाग मध घालून प्याल्यास वांति हटकून राहते.

## ४२ विष.

**१ सोमलविषासः**—कडूनिंबाच्या पाल्याचा रस वांती होईपर्यंत पाजावा, सोमलाचें विष उतरतें; पण शेळीचें किंवा गाईचें दूध १ दिवस पाजावें, दुसरें कांहीं देऊं नये.

२ स्थावर, जंगम इत्यादि सर्व विषांस:—कडूनिंबाच्या निंबोण्या २ भाग, सैंधव १ भाग, मिरें १ भाग हीं सर्व वांटून मध व तूप घालून द्यावें.

**३ नख व दांत यांच्या विषास:**—कडूनिंबाची साल, शमीची-साल, वडाच्या पारंब्या यांच्या कल्काचा काढा करून त्यानें व्रण धुतल्यास विषनाश होतो.

४ सर्वप्रकारच्या विषांवर:—कडूनिंबाची पानें, लोध्र, हिरडे, हिंग, वेखंड, ही गार पाण्यांत वांटून प्यावी. तत्काल विषनाश होतो.

## ४३. विस्फोट.

१ सर्व तऱ्हेच्या विस्फोटांस:—कडूनिंबाचीं साल, काडेचिराईत, ज्येष्ठमध, नागरमोथे, पित्तपापडा, कडूपडवळ, अडूळसा, वाळा, त्रिफळा, इंद्रजव हीं प्रत्येकीं पाव पाव तोळा घेऊन साधारण कुटून ४० तोळे पाणी घालून अष्टमांश काढा ५ तो० उरल्यावर गाळून साखर घालून घेतला असतां सर्व दोषांच्या विस्फोटाचा नाश होतो. दिवस १४, २१. रात्रीं निकाढा घ्यावा.

२ विसर्प, विस्फोट, कुष्ठ, कंडू, देवी शीतपित्त यांस:—कडू-निंबाचीं पानें, गुळवेल, अडूळसा, नागरमोथे, सातवीण, काळा-खैर, वेत, हळद, दारूहळद यांचा काढा वरीलप्रमाणें करून घ्यावा. लहान मुलांस दरवेळीं १–२ तोळे पाजावा.

**३ विस्फोटजन्य ज्वरास:**—कडूनिंबाची साल, खैराचा कात, गुळवेल, इंद्रजव ह्यांचा काढा मध घालून दिला असतां उत्तम गुण येतो, दि० ३, ७. रात्रीं निकाढा घ्यावा.

४ विस्फोट, कोठ, व्रण, शीतपित्त, रक्तपित्त व रकसा म्हणून क्षुद्र कुष्ठ आहे त्यास:—कडूनिंबाचीं पानें व आंवळकाठीचें चूर्ण बारीक वांटून तुपांतून सकाळीं व रात्रीं जेवणापूर्वी १ तो० प्रमाणें खावें. दि० ३०।४० पथ्य नाहीं.

५ विस्फोटास:—कडूनिंब व गुळवेल यांचा काढा साखर घालून घ्यावा. दि० १४, २१.

## ४४ विसर्प ( धांवरें. )

१ विसर्पास वमन:—कडूनिंबाची साल, कडूपडवळ ह्यांचा काढा करून पिंपळीचें व गेळफळाचें चूर्ण घालून वांती होण्याकरितां पाजावा.

२ विषजन्य विसर्पास:—कडूनिंब, कडूपडवळ, अडूळसा, गुळवेल, त्रिफळा, खैराचा नार, बाहव्याची शेंग ह्यांचा काढा गुग्गुळ घालून पाजावा, म्हणजे विषजन्य विषाचा व सर्व कुष्ठांचा नाश होतो.

२ निंबसाल, नागरमोथे, कडूपडवळ यांचा काढा तूप घालून घ्यावा; तो विसर्पाचा नाश करितो.

## ४५ व्रण.

व्रणाच्या दाह व सूज यांस:—कडूनिंबाचीं पानें पाण्यांत वांटून ऊन करून व्रणावर बांधावीं; म्हणजे सूज उतरून रक्तशुद्धि होऊन दाह शांत होतो. इतर उपायांपेक्षां हा उपाय सोपा असून गुणानें श्रेष्ठ आहे.

२ व्रण धुण्यास:—कडूनिंबाच्या पानांचा चतुर्थांश काढा करून त्यानें व्रण धुतल्यास व्रणाचें शोधन होऊन तो लौकर भरून येतो.

३ व्रण फुटल्यावर तो कडूनिंबाच्या पाल्याच्या व कडूपडवळाच्या पाल्याच्या काढ्यानें धुवावा आणि शोधन होण्याकरितां कडू-

निंबाचीं पानें व तीळ बारीक वांटून मधांत खलून तें व्रणांत भरावें; म्हणजे व्रणाचें शोधन होतें. नंतर त्यांत तूप भरून पट्टी बांधावी; व्रण भरून येतो. व्रण खोल असल्यास कडूनिंबाच्या बियांचें तेल व ज्येष्ठमध, रसांजन खलून वातीस लावून ती वात व्रणांत नित्य नवी घालावी. कसलाही व्रण व नासूरही भरून येतें.

**४ कसलाही व्रण धुण्यास व कुजक्या जखमा धुण्यास उत्तम काढा**:—निंबाची कोंवळीं पानें २ भाग, वड, पिंपळ, उंबर, पायरी, नांदरूख, खैर, यांच्या साली, चिकणामूळ, दर्भमूळ हीं १–१ भाग, हिरडा, बेहडा, आवळकाठी हीं अर्ध अर्ध भाग घेऊन यांच्या चतुर्थांश काढ्यानें नित्य व्रण धुवून मग मलमपट्टी किंवा खोल व्रणांत मलम वातीस लावून किंवा तेलाची किंवा करकानें माख-लेली वात व्रणांत बसवून पट्टी बांधावी; म्हणजे व्रण किंवा अग्नि-दग्ध व्रणही बिनधोक फार लौकर भरून येतो.

**५ व्रणांत कृमि झाले असल्यास**:—कडूनिंब, करंज, निर्गुडी यांच्या पाल्यांचा रस काढून व्रणांत घालून पट्टी बांधावी; कृमि नाश पावतात.

६ कडूनिंब, रुई, बाहवा, जाई, कण्हेर, सातवीण यांचे यथालाभ पाले घेऊन गोमूत्रांत वांटून व्रणावर लेप द्यावा किंवा व्रण धुवावा; म्हणजे कृमि नाश पावतात.

**७ दुष्टव्रणाचें शोधन होणेस व भरून येणेस**:—कडूनिं-बाचीं पानें, दांती–मूळ, तीळ, निशोत्तर ( तेड ) यांचा कल्क काल-वून व्रणांत भरावा व वर पट्टी बांधावी.

**८ फुटून वाहणारे व्रण बरे होणेस**:—त्रिफळ्याच्या काढ्यानें व्रण स्वच्छ धुवून त्यांत कडूनिंबाचा पाला बारीक वांटून भरून वर करंजाचें पान बसवून फडक्यानें बांधावें; लौकर बरा होतो. पथ्य:— तूपरोटी, वरण, अळणी, जोंधळ्याची भाकरी.

**९ आगंतुक व्रण, करटें व गळवें यांस:**—कडूनिंबाचा पाला तेलांत भाजून तव्यांत राख झाल्यावर खलून व्रणांत मलम भरून वर पट्टी बांधावी.

१० कडूनिंबाचा पाला व तीळ खलून मधांत घोटून व्रण बांधल्यास चांगलें शोधन होतें. त्यांतच तूप खलून भरल्यास व्रण भरून येतो.

११ निंबाची पानें, दारूहळद, ज्येष्ठमध, तीळ, तूप, मध यांचें मलम कापडाचे वातीस लावून ती वात खोल गेलेल्या व्रणाच्या छिद्रांत घालावी आणि उथळ व्रणांत मलम लावून पट्टी बांधावी; तिळांचे बदली तिळाचें तेल घेतल्यासही चालेल.

**१२ निंबघृत:**—निंबाचा पाला, कडूपडवळाचीं पानें, जाईचा पाला, कुटका, हळद, दारूहळद, उपरसाळी, मंजिष्ठ, वाळा, मोर्चूद, ज्येष्ठमध, करंजाचें बीं हीं सर्व समभाग घेऊन वांटून कल्क करून त्याच्या चौपट तूप व तुपाच्या चौपट पाणी घालून कढवून तूप उरल्यावर गाळून ठेवावें. हें तूप बारीक तोंडाच्या व्रणांत, मर्मस्थानचे व्रणांत, सतत वाहणाऱ्या व्रणांत, खोल गेलेले ठणकणारे व फार दिवसांचे नाडीव्रणांत या मलमाचा उत्तम उपयोग होतो.

१३ नुसता कडूनिंबाचा पाला मधांत खलून लावावा; व्रणाचें शोधन होतें.

**१४ कृमि, कंडू, ठणका यांस:**—कडूनिंबाचीं पानें, वेखंड, हिंग, तूप, मीठ, सैंधव यांचा धुरी व्रणास द्यावा. कृमि मरून कंडू व ठणका जातो.

**१५ व्रणादिकांवर निंबकल्क:**—कडूनिंबाचीं पानें पाण्यांत वांटून व्रणावर लेप करावा. व्रणाचें शोधन होऊन भरून येतात.

## लासूर ( हाड्या व्रण ).

१६ **लासूर भरून येणेसः**—कडूनिंबाच्या बियांचे तेलाची वात घालावी. दि. ७।१४ हटकून भरून येते.

१७ निंबपत्रें व तीळ वांटून किंवा मधांत खलून जखमेंत भरल्यास जखमा भरून येतात. दि. ३।५।७ किंवा तुपांत खलून भरावें.

१८ निंबपत्रें, तूप, मध, दारुहळद, जेष्ठमध, तीळ, सममाग घेऊन घोटून सर्व मलम तयार करून जखमेवर लेप करावा; किंवा वातीस लेप करून ती वात जखमेंत घालावी. शुद्ध होऊन जखमा व व्रण भरून येतात. दि. ५।७।१४.

१९ कडूनिंबाचीं पानें, तीळ, दंतीमूळ, तेड, सैंधव, सर्व समान घेऊन वांटून कल्क, मधांत मिसळून लेप किंवा तो कल्क वातीस लावून ती वात व्रणांत घातल्यास दुष्ट व्रणही शुद्ध होऊन भरून येतात. दि. ७।१४.

२० निंब, शमी, चमेली, रुई, सातवीण ह्यांचीं पानें, कणेरीचे मूळावरील साल सर्व समान घेऊन वांटून गोमूत्रांत शिजवून त्यानें घाव किंवा व्रण धुणें अथवा पोटीस बांधणें अगर धार धरणें वगैरे सोसेल तसा उपयोग केल्यास दुष्ट व किडे पडलेलेही जुने व्रण जातात. दि. ७।१४.

## ४६ वृश्चिक–दंश.

१ विंचू चावलेल्या बाजूच्या कानांत कडूनिंबाचा पाला चिलमींत घालून ओढून तोंडांत धूर घेऊन सोडावा. फुलाचा धूर जास्त गुणदायक आहे. दंशस्थानीं बियांचें तेल चोळावें

## ४७ शीतपित्त.

१ कडूनिंबाची साल, गुळवेल, हळद, घमासा, ह्या प्रत्येकाच

काढा किंवा सर्वांचा काढानिकाढा निवाल्यावर मध घालून घेतल्यास शीतपित्त जातें. दि. ३.

२ तुपांतून निंबाचीं पानें आणि आवळ्याचें चूर्ण समभाग खावें. म्हणजे क्षत, विस्फोट, शीतपित्त, कंडु हीं जातात. दि. ३।५।७.

३ कडूनिंबाची साल, गुळवेल, हळकुंड, धमासा, ह्यांचा काढा शीतपित्तावर जीवन देणारा आहे.

### ४८ शूळ.

१ **शूळ व आम्लपित्तास पंचनिंबचूर्णः**—निंबाची साल, पानें, फुलें, फळें, व मूळ यांचें समभाग चूर्ण एक भाग, वरधारा चूर्ण २ भाग, सातूचूर्ण १० भाग; यांत साखर चतुर्थांश घालून दर वेळीं २ तोळे चूर्ण खावें. दि. ७।१४.

२ कडूनिंब, बाहवा, ज्येष्ठमध, त्रिफळा, यांचा काढा मध घालून प्यावा. रात्रीं निकाढा प्यावा. दि. ७ पोटशूळ व दाह जाईल.

३ **वातपित्तज शूळासः**—कडूनिंबसाल, धमासा, पित्तपापडा, सुंठ, कडूपडवळ पत्र, नागरमोथे, चिंच, या सर्वांचा बारीक कल्क ( चटणी ) करून त्यासमान साखर घालून दरवेळेस २ तोळे सुमारें घेऊन खावें. वातापित्ताशूळ राहतो. दि. ३।७.

### ४९ श्लेष्मा.

१ कडूनिंबाचा पाला वांटून मस्तकीं बांधावा.

### ५० सर्पदंश.

१ **सर्पविषासः**—प्रथम सर्प चावला किंवा नाहीं याची परीक्षा करण्याकरितां निंबपाला खाण्यास द्यावा. किंवा मिरच्या अगर मीठ खाण्यास द्यावें. कडू, तिखट किंवा खारट न लागल्यास सर्पदंश झाला आहे, असें समजून मग कडूनिंबाचा पाला कडू लागेपर्यंत खाण्यास द्यावा; किंवा पाल्याचा रस पोटभर पाजावा; ओकतांच

विष उतरेल. दंशस्थानीं रक्त आलें किंवा नाहीं तें पहावें व दंशस्थानापासून चार बोटें घट्ट दोरी किंवा पट्टी बांधावी. त्या इसमास सहा तास निजूं देऊं नये, विटाळशीची सावली पडूं देऊं नये आणि त्यास जेवूंही घालूं नये.

२ **सर्पविष न बाधण्यासः**—नित्यनेमानें कडूनिंबाचीं पानें खावीं; म्हणजे सर्प-विष-बाधा होत नाहीं.

## ५१ सूज.

१ **दाहयुक्तसुजेवरः**—कडूनिंबाचीं पानें वांटून बांधावीं; रक्तदोष व दाह कमी होतो.

२ बाळंतनिंबाची साल, पुनर्नवा ( घेटोळी ) मुळी, कडूपडवळ, गुळवेल, सुंठ, कुटकी, दारूहळद, बाळहिरडे यांचा निकाढा घेतल्यास सर्वांगाची सूज, नाळगूद, उदर, खोकला, शूळ श्वासासह पांडुरोग यांचा नाश होतो. दि. ७।१४. पथ्यः—ऊन पाणी प्यावें व हलकें अन्न खावें. तेल, तिखट, आंबट वर्ज्य.

३ कडूनिंब, कुडा, रुई , शिरस, तेड, एरंडपानें, हीं पाण्यांत कढवून त्याचा वाफारा सुजेस दिल्यास दुष्ट सूजही जाते. वाफारा दिल्यावर निवाऱ्यांत रहावें.

४ कडूनिंबसाल, रुईचें मूळ, वसूमूळ, ह्यांच्या काढ्यानें शेकावें. सूज जाते.

५ कडूनिंबसाल, त्रिफळा, कडूपडवळ, अडुळसा, यांच्या काढ्या-निकाढ्यांत गुग्गूळ घालून प्याल्यानें सूज जाते. दि. ३।७.

## ५२ स्त्री-रोग.

१ **प्रसूत स्त्रीसः**—पहिल्या दिवसापासून कडूनिंबाचा ( बाळंतनिंबाचा ) पाला घेऊन त्याचा पाणी घालून वांटून अंगरस गाळून ४।५ तो० पर्यंत शक्ति पाहून द्यावा; म्हणजे गर्भाशयाचें संकोचन

होतें; विटाळ साफ जातो; गर्भाशय व त्याच्या आजूबाजूची सूज जाते; ताप येत नाहीं; भूक लागते; कदाचित ताप आला तर कम जोर येतो; शौचास साफ होतें. या प्रकारांत आणखी एक फायदा होतो तो असा कीं, निंबाचा कांहीं अंश आईच्या स्तनांतील दुधांतून मुलाच्या पोटांत गेल्यामुळें त्याची प्रकृति निरोगी राहते. बाळंतिणीच्या शरीरस्नानाकरितां पाणी तापवितांना त्यांतनिंबाचे डाहाळे घालून तापवून त्या पाण्यानें प्रक्षालन न्हाऊं घातल्यास फार हितावह होऊन घामोळें वगैरे स्वग्रोग होत नाहींत. कडूनिंबाच्या झाडाचा अनेकप्रकारें बाळंतिणीला उपयोग होतो, म्हणून त्यास 'बाळंत-निंब' म्हणतात.

२ स्त्री बाळंत होतांना शिवण फाटून व्रण झाल्यास निंबाच्या पाल्याच्या काढ्यानें दोन दोन तासांनीं धुऊन निंबाच्या बियांच्या तेलाची घडी बसवावी. व्रण त्वरित भरून येतो.

३ **योनि-शूळास**:—निंबोण्या व एरंड्या सोलून वांटून गोळी करून योनींत ठेवावी अथवा लेप द्यावा.

४ **धुपणीस**:—कडूनिंबाच्या सालीच्या रसांत जिरें, खडीसाखर यांची पूड घालून सकाळ संध्याकाळ अर्धी वाटी रस पाजावा. दिवस ७.

५ **धुपणीस**:—कडूनिंबाच्या पाल्याचा रस मध घालून दहा तोळेपर्यंत द्यावा. कफज-धुपणीस उत्तम आहे.

६ **बाळंतरोगावर उपचार**:—जुनाट निंबाची अंतरसाल घेऊन कुटून तीन घागरी पाणी राहील असा हंडा किंवा डेरकें घेऊन त्यांत कुटलेली साल व पाणी घालून झांकण ठेवून दोन कढ येईपर्यंत तापवून बाळंतरोगी स्त्रीस बाजेवर निजवून एका तपेल्यांत आधण आलेल्या पाण्यापैकीं १ घागर पाणी घालून तपेलें स्त्रीच्या उशाखालीं

उबडें ठेवून वाफ मस्तकास लागूं द्यावी. थोड्या वेळानें मस्तकाखालचें तपेलें पाठीखालीं ठेवून दुसरें तपेलें पाणी भरून उशाखालीं ठेवावें. त्याची वाफ संपल्यावर कमरेखालचें तपेलें पायागतीं ठेवून तिसरें तपेलें उशागतीं ठेवावें. याप्रमाणें ७ रात्रीं हा प्रयोग करून घाम पुसून निजवावें. वाफारा देतांना बाजल्यावर पातळ कपडा घालून त्यास जाड पांघरूण घालावें; म्हणजे घाम लौकर व पुष्कळ येईल. यानें बाळंतरोगापैकीं मुख्य जो वात तो निघून जाऊन आराम वाटेल. पथ्यः—दूधभात व दूधच घ्यावें.

७ सुधागड तालुक्यांत पडघोळी या नांवाचें एक खेडेगांव आहे. त्याठिकाणीं वे. रा. विष्णुभट हे उत्तम ज्योतिषी, मांत्रिक व वैद्य असल्याचें सुप्रसिद्ध आहे. त्यांचे बाळंत व क्षयरोगावरील अत्यंत गुण देणारें औषधः—एक २।३ शेर पाणी मावेल असें मोठें मडकें झांकणासह घ्यावें. मडक्यांत कडूनिंबाचा पाला तोंडापर्यंत भरून त्यावर झांकण ठेवावयाचें व मग तें मडकें चुलीवर ठेवून त्याच्याखालीं जाळ लावावा. खालील आंचीनें मडक्यांतील पानांची राख झाली म्हणजे, तें मडकें चुलीवरून उतरून त्याची राख फेकून देऊन तें पालथें घालून ठेवावयाचें. याप्रकारें काढ्याकरितां मडकें तयार झालें म्हणजे त्यांत पाऊणशेर पाणी घालून सुंठ १ तोळा, दालचिनी १ तोळा, व जिरे १ तोळा हीं द्रव्यें घालावयाचीं काढा मंदाग्नीवर शिजवून सुमारें ४।५ तोळे उरला म्हणजे तो कोमट असतांना घ्यावा. निकाढा घेणें नाहीं. आतां हें औषध चालू असतां रोग्यानें पदार्थ खावयाचे ते खालीं लिहिल्याप्रमाणेंः—भात, गाईचें दूध, दहीं व तांक, आल्याची चटणी, फेणी, एखादी सौम्य भाजी तुपाच्या फोडणीची व शेंदेलोण, पाणी थंड घ्यावयाचें. याप्रमाणें हा काढा प्रकृतीमानाप्रमाणें १४ अगर २१ दि. घ्यावा.

८ **स्त्रियांचें मुखास तेज येणेस:**—निंबाचीं पानें, बाळहिरडे, लोध्र, करंजाची साल, डाळिंबफळाची साल, ह्यांचें चूर्ण बाभळाच्या काढ्यांत घोटून लावावें. मुख तेजदार व सुंदर दिसतें.

९ **स्त्रीस दूध अधीक येऊं लागल्यास कमी करणेस:**—कडू-निंबाची साल, त्रायमाण, गुळवेल, कडुपडवळ, त्रिफळा, आवळीकात, यांचा काढानिकाढा द्यावा. दि. ३।७. खास दोष जातात.

## ५३ क्षुद्ररोग–अलस.

१ कुजलेला चिखल पायास लागल्यामुळें पायाच्या बोटाच्या सांध्यांतील कातडीं कुजतात, खाज सुटते, आग होते त्यास अलस म्हणतात.

उपाय:—कडूनिंब, कडूपडवळ, मनशील तेलांत खलून लावावें.



श्री

# बिल्वमहत्त्व.

---

लेखक व प्रकाशक

प्रभाकर बाळाजी ओगले

( चिकित्साप्रभाकर, सुलभौषधिप्रभाकर,
निंबप्रभाव, तुलसीप्रतापकर्ते. )

मुक्काम ओगलेवाडी

सं० औंध. जि० सातारा.

---

मुद्रक

श्रीपाद दामोदर सातवळेकर,

भारत-मुद्रणालय सं० औंध.

शके १८५४

किंमत ३ आणे.

# प्रस्तावना

बेलाचीं झाडें सर्व भरतखंडांत हिमालयापासून रामेश्वरापर्यंत प्रत्येक गांवीं आहेत. त्यांतही दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटकांत लिंगायत लोकांचे मठांत तर हीं बेलाचीं झाडें असलींच पाहिजेत. कारण बेलाच्या त्रिदळी पानाशिवाय लिंगपूजन सांग होतच नाहीं. कर्नाटकांत तर लिंगाईत लोकांच्या वस्तित हिरेमठ ( थोर किंवा मुख्य मठ ) असतोच व तेथें बेलवृक्ष हा असावयाचाच. जसी विष्णुभक्तास तुळस तसाच शिवभक्तास बेल हा पूज्य आहे. परंतु धार्मिक बाबीशिवाय बेलवृक्षाच्या पंचागांचें म्हणजे पानें, फुलें, साल, फळें, मूळ ह्यांचा रोगनिवारणार्थ औषधी उपयोग केवळ बेल वृक्षाचा व त्याचेच साह्यार्थ इतर औषधी घेऊन कसा उपयोग करावा हें माहित नसतें तें ह्या लहान पुस्तकांत निरनिराळ्या ४६ रोगांवर १८६ प्रयोगांनीं खुलासेवार दाखविलें आहे.आणि हीं औषधें घरोघरीं बिनखर्चीं किंवा अल्पखर्चीं सहज खेडोखेडींही मिळण्यासारखींच लिहिलीं आहेत.

दुसरें असें कीं फक्त लिहीतांवाचतां येणाऱ्या पाटील कुलकर्णी व गावांतील इतर लोक-पुरुष व स्त्रिया यांनाही या पुस्तकावरून आपलें व आपले कुटुंबांतील माणसांचें आरोग्य संभाळतां येईल.

हें पुस्तक म्हणजे खेड्यांतील मास्तरांचा मित्रच आहे. कारण आपलें व गांवांतील लोकांचें आरोग्य संभाळतां येऊन गावांतील लोकांवर उपकार करतां येऊन प्राप्ती होऊन गावांत त्यांची मान्यताही चांगली राहते.

चैत्र शु॥ १ शके १८५४
मु० ओगलेवाडी
सं० औंध

प्रभाकर बाळाजी ओगले

# बिल्वमहत्त्व

## बेलाचीं नांवें

बिल्वं शांडिल्य-शैलूषौ मालूर-श्रीफलावपि ॥
[ बिल्व, शांडिल्य, शैलूष, मालूर, श्रीफल. ]

## इतर भाषेंतील नांवें

( सं. ) बिल्व, ( गु. ) बीली, ( पंजाबी ) सीफल, बील, ( काश्मीर ) बिलकथ, (ता.) बिल्वं, ( ते. ) बिल्वमु, ( क. ) बेल,(तु.) बेल्ल, ( मलाई ) कूवळम्, ( को ) बेल्ल, ( सिंगाली ) बेल्लि, ( मलै ) बुइबैल, ( बं. ) बेल, ( हिं. ) बेल, ( सिंध ) बिल, ( इं. ) Ægle marmelos. इगल् मार्मेलोस.

## बेलाचे गुण.

श्रीफलस्तु वरस्तिक्तो, ग्राही रूक्षोग्निपित्तकृत् ॥
वातश्लेष्महरो बल्यो लघुरुष्णश्च पाचकः ॥

बेल हा तुरट, कडू, संग्राही, रूक्ष. अग्नि व पित्त वाढविणारा, वातज व कफज रोगांचा नाश करणारा, बलकर, उष्ण व पाचक आहे.

## निघंटाचें मत

बेलाचें झाड— मधुर, हृद्य, कषाय, रुचिकर, दीपन, ग्राहक, उष्ण, कडू, रूक्ष, पित्तकर, गुरु, पाचक व वात, ज्वर, अतिसार, यांचे नाशक आहे.

कोंवळें फळ— स्निग्ध, गुरु, ग्राहक, दीपन, रुच्य, कडू, पाचक, लघु, तुरट, उष्ण व वात, कफ, आंव, शूळ, संग्रहणी, अतिसार यांचें नाशक आहे.

जून फळ— आंबट, ग्राहक, तुरट, कडू, तिखट, उष्ण, स्निग्ध, तीक्ष्ण, लघु, दीपन, पाचक, हृद्य व कफ, वायु यांचें नाशक आहे.

पक्व फळ— दाहक, मधुर, गुरु, विष्टंभकर, तुरट, तिखट, कडू, उष्ण, ग्राहक, दोषल, दुर्जर, वातल. अग्निमांद्यकर असें आहे.

बेलाचें मूळ – मधुर, लघु व त्रिदोष, छर्दी. मूत्रकृच्छ्र, शूळ, वायु, कफ, पित्त यांचें नाशक आहे. मुळाचा उपयोग प्रमाणाबाहेर झाल्यास कैफ येतो. दशमुळाच्या काढ्यांत बेलमूळ मुख्य आहे. मूळ मज्जातंतूस शामक आहे.

फूल – बेलाचें फूल हिरवट रंगाचें असतें. ह्याचा उपयोग कोणी औषधांत करीत नाहींत. फुलाचें अत्तर काढितात.

एकंदरीत बेलाचे सर्वच भाग औषधांत व व्यापारी जिनसांत-ही उपयोगीं पडतात.

दुसरें मत – पक्वदशेंत आलेल्या परंतु, हिरव्या फळाचा गीर [ ( सं० ) बिल्वपेशिका, ( काश्मीर ) शीफल मूज. ( गु. ) बीलीनु मगज. ( हिं. ) बेल गिरी. ] हा स्निग्ध, गुरु, दीपन, संग्राहक आणि आंतड्यांस शांति देणारा आहे. पक्व फळाचा गीर अनुलोमिक आहे.

पानें – कटु, पौष्टिक, आनुलोमिक, शोथप्रतिकारी, ज्वरहर, श्लेष्मनिःसारक, व्रणशोधन, व्रणरोपण आहे.

बेलाचीं झाडें मोठीं असून सर्व हिंदुस्थानांत कोठेंही होतात. हिमालयांत ह्यांची उत्पत्ति फार आहे, व फळेंही पुष्कळ येतात. पण पंजाब व बंगालमध्यें लागवड केलेल्या बेलाचे झाडास त्याहून मोठीं व उत्तम फळें येतात. हीं कवठासारखीं वाटोळीं असून मोठीं असतात. कवठें पिकलीं तरी वरील कवटीचा रंग पालटत नाहीं. पण बेलफळ पिकलें म्हणजे वरील कवचीचा रंग पिवळट भुरकट होतो. तसाच आंतील गरही तांबूस पिवळट होतो. व

बेलफळाच्या गरांत व भोंवतीं पोकळ्या असतात आणि त्यांतच बिया असतात. पण कवठाच्या गरांत तशा पोकळ्या नसतात. पिकलेल्या फळाची रुचि गुळमट असून स्वादिष्ट असते, व गर चिकट असतो. कोंवळ्या फळाची भाजी गरीब लोक करितात. व कोणी कोणी लोणचेंही करितात.

रसशास्त्र— रानटी बेलफळें कैफी असतात. कोळीलोक मासे मारण्यास ह्याच्या गराचा उपयोग करितात. पण लागवड केलेल्या फळांत कैफ नसतो. फळांत बियांसभोंवतीं तांबूस उदी-रंगाचा डिंक असतो. हा लागवड केलेल्या फळांपेक्षां रानटी फळांत अधिक असतो, ह्या डिंकाचा फार उपयोग आहे.

बेलाचा धार्मिक विचार— हिंदुस्थानांतील सर्व शिवभक्त व त्यांतही लिंगाईत ( लिंगधारी शिवभक्त ) यांचे नित्य पुजेस बेलपत्रीशिवाय चालतच नाहीं. पार्थिवपूजेस तर बिल्वपत्र असलेंच पाहिजे. त्याशिवाय पूजा सांग होतच नाहीं. सर्व भरत-खंडांत हिमालयापासून रामेश्वरापर्यंत जेथें जेथें श्रीशिवालयें आहेत त्या त्या स्थळीं किंवा गावीं बिल्ववृक्ष असावयाचेच. कोठें कोठें बागाही पाहण्यांत येतात. पंढरपुरांत जशा तुळशी विकत मिळतात तशीं बिल्वपत्रेंही काशी, कांची, रामेश्वर, श्रीशैल्य वगैरे ठिकाणीं विकत मिळतात. लिंगाईत वस्तींत व कर्नाटक देशांतील मठांत बेलाचीं झाडें पुष्कळ व फार जुनाटही आहेत. शिवलीलामृत, पद्मपुराण, स्कंदपुराण ह्यांत बिल्वमाहात्म्य फार प्रशंसापूर्वक वर्णिलें आहे. अशा प्रकारें हें बेलाचें धार्मिक माहात्म्य आहे.

बेलाचा व्यापारी उपयोग— बेलफळें पिकण्याचा हंगाम मार्ग-शीर्ष व पौषमासीं असतो. तीं पिकलीं म्हणजे त्यांच्या गराचा

डिंकाऐवजीं उपयोग करितात. कोठें कोठें व्यापारी लोक कवठाचा व बेलफळाचा गीर एकत्र मिसळून वाळवून विकतात, पण कवठाच्या गिराचा वाळल्यावरही तुरटपणा जात नाहीं त्यावरून ओळखावें. मातीच्या चित्रास रंगास तकाकी येण्यास रंगांत बेलफळाचा डिंक निराळा काढून मिसळतात. तेणेंकरून चित्रास तकाकी येऊन ती चांगली टिकते. आणखी पिकलीं फळें कापून फळांतील गीर अगदीं साफ काढून करट्या वाळवून त्याच्या डब्या, खुळखुळे, किरकिरी करून सुंदर रंगवून विकतात. हा एक बिनखर्ची किफाईतशीर धंदा आहे. बेलफळाची साल पिंवळा रंग करण्यास उपयोगी पडते. प्राचीन काळापासून वैद्यलोक बेलफळें कोरून वाळवून पोखरून त्याचा काचकुप्या ऐवजीं उपयोग करून घेऊन त्यांत भस्में, चूर्णें भरून ठेवीत व तीं फार दिवस टिकतही असत. आलीकडे कांच कुप्या सवंग व सुरेख मिळूं लागल्यामुळें कोणी त्या खटपटींत पडत नाहींत. अफगाण लोकांत बेलफळाच्या वस्तूंचा खप चांगला होतो. व पेशावरास तर बेलफळाच्या जिनसांचा मोठा व्यापारच चालतो. बेफळांतील डिंकांत चुना खलून लुकण करून कप, बशा, व इतर चिनीमातीचीं फुटकीं भांडी जडण्यास उपयोगीं पडतें. खाद्य पदार्थांत, मोरांबा, लोणचें, रायतें करितात. औषधांत तर फारच फायदा होतो. हें पुढें रोगवार माहितींत दाखविलें आहे. पत्रें व इतर चिकटविण्याच्या कामीं बेलफळाच्या डिंकाचा चांगला उपयोग होतो.

## १ अग्निमांद्य

१ बेलफळांतला गर, काकडशिंगी, नागरमोथे, हिरडेदळ, सुंठ यांचा काढा निकाढा गूळ घालून दिल्यास पचनक्रिया वाढते. दि०७

२ कबज व पोटफुगी ह्या कुपचन रोगांत व केव्हां जुलाब केव्हां कबज होतात अशा स्थितींत पिकल्या फळाच्या गराचें सरबत सकाळीं सुंठीची पूड घालून पाजावें. दि० ३।५।७ पथ्य तूपभात, ताकभात, ऊनपाणी.

३ कवठ व बेलफळांतील गर, डाळिंब, चुका घालून ताक कढवून निवल्यावर प्यालें असतां अग्निमांद्य व संग्रहणी जाते. दिवस ७ दोहीं वेळां.

४ बेलफळांतील गीर, काकडशिंगी, नागरमोथे हिरडा व सुंठ यांचा काढा निकाढा प्याल्यानें अग्निमांद्य जाऊन बळ वाढतें. दि० ७

## २ अतिसार

१ कोंवळें बेलफळ, गूळ, पिंपळी, सुंठ यांचें चूर्ण तिळाचें तेलांत कालवून किंवा तिळांत वाटून सकाळ संध्याकाळ घेतल्यास शूळयुक्त वातज प्रवाहिका राहते. दि० ३।५ पथ्य ऊनपाणी ताक भात.

२ बेलफळ भाजून त्याचा गर २, गूळ २, लोध्र१, मिरें १, यांचे भागवार चूर्ण घेऊन तिळांचे तेलांतून किंवा तिळांत खलून दोन्ही-वेळां घेतल्यास प्रवाहिका लौकर जाते.दि०३ पथ्य वरील प्रमाणें.

३ बिल्वपंचकषाय— सालवण, पिठवण, बेलाची साल ( मुळाची साल ) चिकणामूळ, डाळिंबसाल यांचा काढा निकाढा दिला असतां, अतिसार, ज्वर, वांति हीं जातात. दि० ३।५

४ बेलफळाचा गर, इंद्रजव, नागरमोथे,वाळा, अतिविष ह्यांचा काढा निकाढा दिल्यास अमांशासह पित्तातिसार जातो. दि०५।७

५ वातकफज अतिसार- बेलफळाचा गर, इंद्रजव, पहाडमूळ,

हिर्डेदळ ह्यांच्या काढ्यांत हिंग घालून घ्यावा. ३ । ५ दोन्ही वेळां. हा पाचकही आहे.

६ कफातिसारास— बेलफळाचा गर, काकडशिंगी, नागरमोथे, हिरडा, सुंठ यांचा काढा निकाढा दिल्यास कफातिसार जातो. दि० ३ । ७

७ सर्वातिसारास— बेलफळाचा गर व आवळकाठी यांच्या काढ्यांत मध साखर घालून घेतल्यानें अतिसार जातो. दि० ३।५ दोन्हीं वेळां.

८ रक्तातिसारास— बेलफळाचा गर बकरीच्या दुधांत घालून त्यांत साखर, मोचरस (सावरीचा डिंक) इंद्रजव यांचें चूर्ण घालून कढवून प्यालें असतां रक्तातिसार जातो. दुधांत निम्मे पाणी घालून कढवून पाणी आटल्यावर औषधी चूर्ण १ तोळा घालून प्यावें. दि. ३ । ५ दोहीं वेळां.

९ रक्तातिसारास— कोंवळ्या बेलफळाचा काढा गूळ घालून घ्यावा. दि० ३ रोज ३ वेळां.

१० कोणत्याही प्रकारच्या अतिसारास— कोंवळें बेलफळ, अंब्याची कोय यांचा काढा साखर मध घालून द्यावा. दि०३।५।७ काढा दोहीं वेळा.

११ सर्वप्रकारच्या अतिसारास— बेलाच्या व आंब्याच्या झाडाच्या सालीचा अष्टमांश काढा करून मध साखर घालून पाजावा. दि० ३ । ७ दोहीं वेळां.

१२ बेलफळाचा मोरांबा खाण्यानें चांगला गुण येतो. दि० ७

१३ अतिसारांत आंतड्यांची शक्ति वाढण्यास— कच्या बेलफळाचा गीर व तवकीर ह्यांची लापशी करून सकाळसंध्याकाळ द्यावी दि० ७

१४ पक्वातिसार, पित्त, व्रणरोपक यांस— बेलगीर, पहाड-मूळ, धायटीचें फूल, मंजिष्ठ, टेंटूमूळ, लोध्र, पलाश, पद्मकेशर, नांदरूखसाल, यांचा काढा निकाढा घेतल्यास वरील रोग जातात. दि० ७

१५ ज्वरातिसारास—बेलफळाचा गीर, मोठाचिकणा, पिठवण, धने, सुंठ, निळें कमळ ह्यांच्या काढयांत डाळिंबाचा रस घालून वयमानाप्रमाणें १ ते ५ तोळे द्यावा. दि० ३

१६ संपूर्ण अतिसारास— कपित्थाष्टक चूर्ण—अजवान,पिंपळ-मोड, चतुर्जात ( दालचिनी, तमालपत्र, नागकेसर, वेळादाणे; ) सुंठ, मिरें, चित्रक, वाळा, जिरें, धने, संचळ हे १ । १ भाग. व आम्लवेतस, धायटीचें फूल, पिंपळी, बेलफळांतील गर, डाळिंब, ठेचून हीं प्रत्येकीं ३ । ३ भाग, साखर ६ भाग आणि कवठांतील गर ८ भाग सर्व चूर्ण एकत्र करून वयमानाप्रमाणें १ ते ३ तोळे दरखेपेस घेतल्यास अतिसार, संग्रहणी, क्षय, गुल्म, गलरोग, खोकला, श्वास, अरुचि, उचकी यांचा नाश होतो. रोगाच्या मग-दुराप्रमाणें, दि० ३ । ७ । १४ द्यावें.

१७ भयंकर अतिसारास – बेलगीर, गजपिंपळी, जांभळांतील बी, सिंगाडयाचीं पानें, वाळा, नागरमोथें, सुंठ, समभागचूर्ण वयमानाप्रमाणें, मधांतून अर्धा ते १ तोळा घेतल्यास प्रबल अति-सारही जातो. दि० ३ । ७ दोहीं वेळां.

१८ गंगाधर चूर्ण— कायफळ, नागरमोथे, इंद्रजव, अंब्याच्या कोईतील गर, सुंठ, नेत्रवाळा, लोध, पहाडमूळ, जांभळांतील बी, कोंवळें बेलफळ, आवळकाठी, टेंटूमूळ, अतिविष, धायटीचें फूल, यांचें वस्त्रगाळ चूर्ण करावें. हें तांदुळांच्या धुवणांतून मध घालून पाव तोळा द्यावें. यानें संपूर्ण भयंकर अतिसार प्रवाहिकाही जातात. दि० ७ । १४ दोहीं वेळां.

## ३ आमांश

१ आंवरकास - बेलफळाचा काढा गूळ घालून पाजावा, किंवा बेलफळ किंचित् फोडून भाजून त्याच्या गरांत गूळ घालून सरबत करून घ्यावें. दि० ३

२ कोवळें बेलफळ व कुडयाची साल ह्यांचा काढा गूळ घालून द्यावा. दि० ३ यानें आमांश लवकर जातो.

३ बेलफळाचा मुरंबा खाण्यानें आमांश जातो. दि० ३ । ५ । ७ दोहीं वेळां.

४ आमरकास—कच्चें बेलफळ भाजून गर काढून गूळ घालून द्यावें. दि० ३ । ७ दोहीं वेळां.

५ जीर्ण आवेस— बेलफळ, बडीशेप, व वेखंड ह्यांचा काढा द्यावा. दि० ७ । १४

६ पोटांत मुरडा होत असल्यास-बेलफळ भाजून त्यांतील गर सुंठ घालून वाटून गुळांत कालवून रोज ३ वेळां खावें. दि० ३

## ४ अरुचि

१ त्रिफळा, त्रिकटु, बेल, नागरमोथा, पिंपळमोड, चित्रक, दालचिनी, वेलची, तमालपत्र, चव्य, आम्लवेतस, चिंच, हीं सर्व १ । १ भाग सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण व त्या समान साखर मिसळून रोज सकाळ संध्याकाळ १ ते ४ तोळे वयमानाप्रमाणें घेऊन मधांतून खावें. म्हणजे अरुचि, कुष्ठ, प्रमेह, उदर, कामला, हलीमक, संग्रहणी, पांडु, मस्तकरोग, तोंडांतून लाळ गळणें, मूर्च्छा, अग्निमांद्य, रक्तपित्त, विसर्प, सूज, संताप हे रोग जातात, दि० ५।७

२ बेलफळांतील गीर, चित्रक, चव्य, १ । १ भाग; आलें २ भाग यांचा काढा व कल्क यांत शेळीचें दूध व तूप घालून कढवून

शिल्लक राहिल्यावर गाळून ठेवावें. तें दरवेळीं २।२ तोळे खावें म्हणजे अरुचि, अग्निमांद्य, संग्रहणी सूज हीं जातात. दि०५।७।१४

## ५ आनाह ( मलबद्धता. )

१ बेलाच्या पानाच्या २ तोळे रसांत १५ दाणे मिऱ्यांचें चूर्ण घालून घेतल्यास मलावरोध जातो. रस पाणी घालून काढल्यास ५ तोळे द्यावा.

२ बेलाच्या झाडाची साल, महाळुंगाच्या मुळाची साल, पाषाणभेद, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, हीं सर्व १-१ भाग व एरंड-मूळ ८ भाग सर्व मिळून कुटून यांच्या अष्टमांश काढयांत गोमूत्र ५ तोळे; बिडलोण व पादेलोण पाव पाव तोळा घालून प्यालें असतां शौचास साफ होऊन आनाह रोग जातो. दि० ३ सकाळीं एकदां.

३ बेलाच्या पानांचा व कडूनिंबाच्या पानांचा रस पाणी घालून वाटून काढून ४।५ तोळे प्यावा. दि० ३ रोज १ वेळ सकाळीं. मलबद्धता रोग जातो.

४ बेलफळाचा गीर, सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळमोड, पहाडमूळ, हिंग, चित्रकमूळ. पादलोण, पोखरमूळ, जिरें, बिडलोण, अजवान, शेरणी, वावडिंग, सैंधव, वेखंड, चिंच हें सर्व समान घेऊन चूर्ण वस्त्रगाळ करून मध किंवा ऊन पाणी यांतून १ तोळा घेतल्यास, मूळव्याध, संग्रहणी, शूळ, आनाह,हे सर्व रोग जातात. दि० ३।७।१४ दोहीं वेळां.

५ बेलफळांतील गीर, पहाडमूळ, हिरडा, धने, ओवा, सैंधव, बिडलोण, पिंपळमूळ, पिंपळी, चवक, चित्रक, सुंठ,मिरें,जवखार, यांच्या कल्कांत चौपट दहीं व एकपट तूप घालून, शिजवून तूप उरलेवर गाळून ठेवून दर वेळीं ३ तोळे घेतल्यास मलावरोध, अपानवायु, आम, प्लीहा, वातशूळ, गुदभ्रंश हीं जातात. दि० ७

## ६ आमवात.

१ बेलादि दशमुळें, हिरडा, गुळवेल, शतावरी, सुंठ, यांच्या काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा. म्हणजे आमवात व अंगांतील कळा जातात. दि० ७।१४ काढानिकाढा.

## ७ आम्लपित्त.

१ आम्लपित्तानें छातींत जळजळतें, त्यास बेलाच्या पानांचा रस २।३ तोळे काढून सुंठीचें चूर्ण ८ गुंजाभार मध किंवा साखर घालून द्यावा दि० ३।५ दोन्हीं वेळां.

## ८ उचकी ( हिक्का )

१ बेलमूळादि दशमूळें किंवा देवदार यांचा काढा किंवा मद्य ( मदिरा ) पाजावी म्हणजे उचकी, श्वास, तहान जाते.

२ बेल, टेंटू, पाडळ, शिवण, टांकळी यांचा अष्टमांश काढा करून त्यांत तूप, दुध, घालून निवाल्यावर सुंठ, गूळ घालून प्यावें. उचकी राहते. रोज ३ वेळा. यांत काढा ८०तो०,तूप २तो०, दूध २० तोळे असावें.

## ९ उदर.

१ बेलमूळादि दशमूळें, देवदार, सुंठ, गुळवेल, पांढरीवसु, ह्यांचा काढा निकाढा प्याल्यानें जलोदर, सूज, श्लीपद, आणि गलगंड व इतर रोग जातात. दि० ३।७।१४

## १० कर्णरोग.

१ कर्णशूळास उत्तम उपाय — बेलमूळ, एरंडमूळ, रुईचें मूळ. पांढऱ्या वसूचें मूळ ( घेटोळीचें मूळ ) रानतुळस, धोतरा, शेवग्याची साल, अजमोदा, अश्वगंधी, टाकळामूळ, इंद्रजव, रेणुकाबीज, समसमान भाग कुटून सर्वांच्या आठपट कांजींत शिजवून

अर्धा अवशेष झाला म्हणजे वस्त्रगाळ करून, त्याची वाफ रबरी नळीनें कानांत सोडावी. म्हणजे कफ वातज कर्णशूळ जातो. दि० ३।५ ( रात्रीं निजतांना )

२ बहिरेपणास — बेलफळांतील गर गोमूत्रांत वाटून तो कल्क खोबऱ्याच्या किंवा तिळाच्या तेलांत कढवून गाळून ठेवावें, व रोज रात्रीं निजतांना कानांत घालून कापूस बसवून निजावें. दि० ७।१० चांगलें आहे.

३ बेलादि दशमुळें (बेल,पाडळ, टेंटू, शिवण, ऐरण, सालवण, पिठवण, गोखरू, रिंगणी, डोरली, ) यांच्या काढ्यांत किंवा हिरडा, बेहडा, आवळकांठी, भारंगमूळ, कायफळ, यांच्या काढ्यांत हिंग घालून दोहीं वेळां घ्यावें. दि० ३।४।२१घेते वेळीं यांत सुंठ, मिरें, पिंपळी चूर्ण घालावें.

४ बेल, औदुंबर, जांभूळ, कवठ, आंबा या झाडांच्या साली समभाग घेऊन कुटून, अष्टमांश काढा करून त्यांत तितकेंच तिळांचें तेल घालून कढवून तेल शिल्लक राहिलेलें गाळून कुपींत ठेवून रात्रीं कानांत घालून कापसाचा बोळा बसवून निजावें. म्हणजे कान बंद होणें, कर्णपाक पू वाहणें आदिकरून सर्व रोग जातात. दि० ७।१०

५ पिंपळाची व बेलाची साल,कोष्ठ,जेष्ठमध,वेळादाणे (वेलची) देवदार, जटामांशी, रिंगणीमूळ, अगरू सर्व समान घेऊन कल्क करून त्यांत तिळांचें तेल सिद्ध करून कानांत घालून वर कापूस बसवून निजावें. महान कर्णशूळ जातो. दि० ३।५।७

६ बेलफळांतील गीर गोमूत्रांत वाटून त्यांत त्याच्या चतुर्थांश तेल व त्याच्या चौपट बकरीचें दूध घालून कढवून तेल उरल्यावर गाळून कुपींत ठेवावें. तें कानांत घालून वर कापूस बसवावा. बधिरता जाऊन ऐकूं चांगलें येतें. दि० ७।१४।२१

## ११ कफरोग.

१ कफरोगास- बेलाच्या पानांचा अंगरस २।३ तोळे थोडी साखर घालून पाजावा. शौचास साफ होऊन कफरोग जातो. दि० ३।७

## १२ कामला.

१ बेलाच्या पानांच्या रसांत मिऱ्यांची पूड घालून मधांतून घ्यावी. दि० ७ दोहीं वेळां, म्हणजे कामीण नष्ट होते.

२ बेलाच्या पानांचा रस वयमानाप्रमाणें २ ते ४ तोळे घ्यावा. दि० ७ दोहीं वेळां.

## १३ कृमि.

१ जंतांस – बेलाच्या पानांचा रस हिंग घालून वयमानाप्रमाणें १ ते ३ तोळे पाजावा. हिंग पाव ते एक गुंज घालावा.

## १४ गलगंड.

१ बिल्वादि दशमूळें पाण्यांत वाटून ऊन करून लेप करावा. गलगंड जातें. दि० ३

## १५ गुल्मरोग.

१ गुल्मवायूस- कोवळें बेलफळ व सुंठ चेचून अष्टमांश काढा करून गूळ घालून प्यावा. दि० ३।७ दोहीं वेळां गुल्मवात जातो.

२ गुल्मवातास— कोवळीं बेलफळें वाटून गूळ घालून सकाळ संध्याकाळ १ महिना खावें, म्हणजे गुल्मवात, शरीरांत शिरलेला वात, व पाटांतील वात हीं जातात.

३ गुल्मरोगास— बेल, टेंटू, पहाड, शिवण, एरण ह्यांचीं मुळें ह्यांच्या काढ्यांत एरंडयांचें तेल नळीतेडाचें चूर्ण घालून प्यालें

असतां गृध्रसी वात, गुल्मरोग, शूळ हीं लवकर जातात. दि० ७।१४ दोहीं वेळां. ह्यांत एरंडेल दोन तो० नडीतेड ३ मासे व काढा १० तोळे असावा.

## १६ ज्वर.

१ बेलफळाचा गर, वाळा, काडेचिराईत, गुळवेल, धने, सुंठ, कुडथ्याची साल, नागरमोथे, ह्यांचा अष्टमांश काढा निकाढा दिल्यानें ज्वरातिसार जातो. दि० ३।७

२ वातज्वरास – बेल, टाकळा, टेंटू, शिवण, यांचीं मुळें गुळवेल, आवळकाठी, धने यांचा काढा निकाढा दिल्यास वातज्वर जातो. दि० ३।७

३ जीर्णज्वरास – बेलफळाचा गर व एरंडमूळाची साल वाटून घालून दूध कढवून सिद्ध करून प्यालें असतां जीर्णज्वर लवकर जातो. दि० ७।१४ दोहीं वेळां. (दोन्ही औषधें १।१तोळा पाणी व दूध १।१ शेर घालून पाणी आटल्यावर साखर घालून गोड करून द्यावें.

४ अभिन्यास संनिपातास – बेलमूळाची साल, महाळुंगाच्या मुळाची साल, पाषाणभेद, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, सर्व १।१ तोळा घेऊन एकत्र कुटून व एरंडमूळ ८ तोळे कुटून घालून अष्टमांश काढा करून त्यांत गोमूत्र ५ तोळे व पादेलोण ५।५ गुंजाभार घालून मंदोष्ण असा पाजावा. दि० ३।५ काढा निकाढा हा उत्तम आहे.

५ विषमज्वरास— बेलाचीं पानें व मिरें १५ दाणे वाटून त्यांत गूळ घालून वयमानाप्रमाणें पावतोळ्यापासून १॥ तोळ्याच्या ३ गोळ्या करून सकाळीं १ दुपारीं १ व सायंकाळीं १ याप्रमाणें द्याव्या. दि० ३।५

६ चातुर्थिक ज्वरास— बेलफळ व मधुमाधव यांचें चूर्ण १ तोळा घेऊन तें गाईचा पाडा पांढरा आहे अशा गाईच्या दूधांतून प्याल्यास फार दिवसांचा चातुर्थिक ताप जातो. पाळ्या २।३ सकाळ संध्याकाळ. पथ्य दूध भात.

७ जीर्णज्वरास— बेलाच्या मुळावरील साल व सुंठ यांचा काढा सकाळ संध्याकाळ दुधांतून द्यावा. दि० ७।१४

८ विषमज्वरास – बेलाच्या मुळावरील साल, निर्गुडीच्या मुळावरील साल, कडूनिंबाची साल, सुंठ यांचा काढानिकाढा निवाल्यावर मध व मिऱ्यांचें चूर्ण घालून वयमानाप्रमाणें १ ते ४ तोळे द्यावा. दि० ७।१४

९ कफयुक्त ज्वरांत बेलाच्या पानांचा रस दिला असतां शौचास साफ होऊन ज्वर व कफ कमी होतो. दि० ३

१० ज्वर व ज्वरांतील धुंदी उतरण्यास – बेलाच्या पानांचा काढा पाजावा. पानें वाटून गरम करून डोईवर बांधावीं.

११ बिल्वादि दशमूळें व गुळवेल यांचा काढा निकाढा दिल्यानें १३ ही प्रकारचे सन्निपात जातात. दि० ७

१२ टेंटूमूळ, बेलगीर, अतिविष, सुंठ, नागरमोथे, डाळिंब, ह्यांच्या काढयानें सर्व ज्वर व अतिसार जातात.

१३ बिल्वादि पंचमूळ, ( बेलमूळ, शिवणमूळ, पाडळमूळ, टेंटू, टाकळा, ) गुळवेल, नागरमोथे, काडेचिराईत, आवळकांठी, सुंठ, नाकशिंकणी, कुटकी, इंद्रजव, धमासा, ह्यांचा काढा निवाल्यावर मध व पिंपळीचें चूर्ण घालून घेतल्यास संपूर्ण त्रिदोषयुक्त ज्वर व झोंपेंत बडबडणें हीं जातात. दि० ७ काढा निकाढा.

१४ कर्णकसन्निपातास – बिल्वादि दशमुळें, कुटकी, गजपिंपळी, सुंठ, त्रिफळा, काडेचिराईत, मिरें, यांच्या काढानिकाढयानें कर्णकसन्निपात नष्ट होतो. दि० ३।७

१५ सर्व सन्निपात ज्वरास— बेलादि दशमुळें, कचोरा, काकडशिंगी, सुंठ, मिरें, पिंपळी, ह्यांचा काढानिकाढा घ्याल्यानें घोर सन्निपाताचा नाश होतो. असें कपिल महामुनीचें मत आहे. दि० ३ । ७

१६ बेलमूळादि दशमूळाच्या काढ्यांत, पोखरमूळ, व पिंपळी यांचें चूर्ण घालून पाजावें. म्हणजे श्वास, कास, सन्निपातज्वर जातो. तृषा जाते. दि० ७

१७ कफवातज्वरांत अग्निमांद्य, अतिनिद्रा, पाठींत कळा, श्वास, कास उत्पन्न झाल्यास बेलादि दशमुळाच्या काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घालून पाजावा. दि० ३ । ७

१८ पंचमूळें, ( बेल, टेंटू, ऐरण, शिवण, पाडळ; ) चिकणा, बेलफळांतील गीर, गुळवेल, नागरमोथे, सुंठ, वाळा, काढेचिराईत, इंद्रजव. कुडेसाल. ह्यांचा काढानिकाढा घेतला असतां, वात, पित्त, कफ, सन्निपातज्वर, ज्वरातिसार, वांति, शूळ, श्वास, भयंकर खोकला हीं जातात. दि० ३ । ७

## १७ तृषा.

१ बेलमूळाची साल, तुरीचीं पानें, धायटीचें फूल, पिंपळमूळ, पिंपळी, चवक, चित्रक, सुंठ, दर्भमूळ यांचा काढानिकाढा घेतल्यानें तृषा जाते. दि० ३ । ५ । ७

२ बेलगीर, गुळवेल, अतिविष, धने, सुंठ, नागरमोथे, नेत्रवाळा, पहाडमूळ, काडेचिराईत, कुडेसाल, तांबडा चंदन, पद्मकाष्ठ, यांचा काढा घेतल्यास-अथवा सर्व चूर्ण रात्रीं भिजत घालून सकाळीं गाळून घेतल्यास ज्वरातिसार, तृषा, अरुचि, दाह यांचा नाश होतो.

## १८ दुर्गंधी (शरीराची जाणेस.)

१ शरीराची व काखेची दुर्गंधी जाणेस— बेलपानें, हिरडा, विडयाचीं पानें वाटून पाण्यांत कालवून लेप करून लाविल्यावर स्नान केल्यानें दुर्गंधी जाईल.

## १९ नासारोग.

१ बेलफळाचा गीर, मनुका, सुंठ, कोष्टकोळिंजन, पिंपळी, ह्यांच्या कल्कानें, तेल किंवा तूप, सिद्ध करून त्याचें नस्य करावें, म्हणजे क्षवथु ( पडसें ) जातें.

२ पीनसास— बेलादि दशमूळें, धने, पिंपळी, सुंठ, यांचा निकाढा प्यालयानें पाठींतील शूळ, ज्वर, श्वास, आणि पीनस हे रोग जातात. दि० ३ । ७

## २० नेत्ररोग.

१ वाताभिष्यंदास आश्चोतन— बिल्वादि पंचमूळें (बेल, टांकळा, टेंटू, पहाड, शिवण, ह्यांचीं मूळें.) एरंडमूळ, शेवग्याची साल, यांचा काढा उत्तम दाट स्वच्छ फडक्यानें गाळून मंदोष्ण असे बिंदु डोळयांत सोडावे. अथवा मंदोष्ण काढयाची डोळयाचे पापणीवण धार सोडावी. दि० ३ । ५ रात्रीं निजते वेळीं.

२ अभिष्यंद नेत्ररोगांत बेलाच्या पानांचा रस २ । ३ तोळे पाजावा. शौचास साफ होऊन अभिष्पंद रोग कमी पडतो. दि०३

३ डोळे आले असतां—बेलाचीं पानें वाटून डोळयांवर किंचित् गरम करून बांधावीं. दि० ३

४ सर्व नेत्ररोगांस अंजन— बेलफळांतील गीर, गुळवेल, कमलाचे देठ, कडूपडवळाचीं पानें,बकऱ्याच्या लेंडया, दारुहळद, कमळकंद, अनंतमूळ, सर्व समान घेऊन साधारण कुटून अष्टमांश

काढा करून गाळून घेऊन पुन्हां कढवून दाट झाल्यावर त्यांत जाईचीं कोंवळीं पानें एक औषधाच्या दुप्पट व पांढरी मिरीं यांचें चूर्ण खलून वातीसारख्या लांबोड्या गोळ्या करून वाळवून ठेवाव्या. याच्या अंजनानें सर्व नेत्ररोग जातात.

## २१ प्रमेह.

१ ताज्या बेलफळांतील गीर व कबाबचिनी ( कंकोळ ) दुधांतून घ्यावें जुना परमाही जातो. दि० ७।१४ दोहीं वेळां.

२ टेंभुर्णीची व बेलाच्या झाडाची साल, वावडिंग, रिंगणीमूळ, आवळकांठी, नागदवणा, बाभळीची साल, मंजिष्ठ, खैरसाल, चंदन. यांचा काढानिकाढा घ्याल्यानें इतर उपद्रवांचा प्रमेह जातो. दि० ७।१४

## २२ बालरोग.

१ बेलाच्या झाडाच्या मुळावरील सालीच्या अष्टमांश काढ्यांत भाताच्या ( साळीच्या ) लाह्यांचें चूर्ण व साखर घालून चाटवावें; म्हणजे वांती व अतिसार जातो. दि० ३

२ उत्फुल्लिकारोगास— बाळाचें पोट शेकावें. तसेंच पोट व पाठीवर तापलेल्या सळईनें एक बिंदू इतका डाग द्यावा. नंतर बेलाच्या मुळावरील साल, नागरमोथे, पहाडमूळ, हिरडा, बेहडा, आवळकाठी, रिंगणीमूळ, ह्यांच्या काढ्यांत गूळ घालून पाजावें.

३ बाळाचे अतिसारास— बेलफळाचा गर, धायटीचें फूल, वाळा, लोध, गजपिंपळी, ह्यांच्या अष्टमांश काढ्यांत मध घालून यमानाप्रमाणें द्यावा. अथवा ह्या औषधाचें चूर्ण मधांतून चाटवा. म्हणजे बालकाचा अतिसार जातो. दि० ३ दोहीं वेळां.

४ मुलास आंव झाल्यास – बेलफळांतल्या गराचा काढा मध घालून पाजावा. दि० ३ दोहीं वेळां.

५ बालकाचे संग्रहणीस – बेलफळाचा गर, सुंठ यांचें चूर्ण गुळांत खलून सकाळ संध्याकाळ द्यावें. दि० ७।१४

६ मुलाचे वांति व जुलाबास – बेलाच्या मुळावरील साल तांदळाच्या पेजेंत उकडून ती पेज साखर घालून वरचेवर १।१ तासानें ३ वेळ पाजावी· अथवा पिकलेल्या फळाच्या गराचें सरबत साखर घालून पाजावें.

७ आंतड्याच्या विकारास – पिकल्या फळाच्या गराचें सरबत तूप साखर घालून द्यावें.

८ लहानमुलास आंव रक्त पडत असल्यास – बेलफळाचा गीर, बडीशेप, वेखंड यांचा काढा रोज ३ वेळां थोडा थोडा पाजावा; उत्तम गुण येतो· दि० ३।५।७

९ दांत येते वेळेस होणाऱ्या सर्व पिडेस – कृमि व दंतरोगास– द्राक्षें, साखर, सुंठ, जिरें, गुळवेल. मोठा चिकणा, कापूरकचरी, धमासा. बेलमूळ, डाळिंबसाल, तुळस सालवण, नागरमोथे, पोखरमूळ, वेलची, गजपिंपळी, हीं १।१कर्ष घेऊन यांचा कल्क व समभाग त्याच्या चौपट तूप व रिंगणीचा काढा व चौपट गाईचें दूध, सर्व आटवून तूप राहिल्यावर गाळून ठेवावें· वयमानाप्रमाणें मुलास अर्धी किंवा एक पळी द्यावें· म्हणजे वरील सर्व रोग निःसंशय जातात.

१० बेलफळांतील गर, धायटीचें फूल,वाळा, लोध, गजपिंपळी यांचा काढा निकाढा थंड झाल्यावर मध घालून पाजावा· म्हणजे बालकाचा हरएक प्रकारचा अतिसार जातो. दि० ३।५।७

११ धायटीचें फूल, बेलफळांतील गीर, धने, लोध, इंद्रजव, वाळा, यांचें समभाग चूर्ण मधांतून ८ गुंजाभार चाटविल्यास; अतिसार व वांति राहते· दि० ५

१२ बेल, टेंटू, शिवण, पेरण, यांचीं मुळें व अडुळशाचीं पानें यांचा काढा पाजला असतां कफज मसूरिका (देवी) शांत होतात.

१३ बेलमुळाच्या सालीच्या काढ्यांत भाताच्या लाह्या खलून गाळून साखर घालून पाजावें, वांति व अतिसार जातो. दि० ३

## २३ मस्तक रोग.

१ धोत्रा, चिकणा, दूर्वा, अडुळसा, मोठ्या पानांची तुळस, निगुंडी, करंज, भारंगी, वसू, बोर, आंब, या सर्वांच्या पानांचा कल्क, बेलफळाचा गीर, रिंगणी फळें, चित्रक, शेंड ( शेर ) यांचें मूळ, टाकळा, वावडिंग, तेड, मंजिष्ठ, अघाडा, गोमेटी, या सर्वांचा कल्क करून चौपट पाण्यांत कढवून चौथाई झाला म्हणजे तो काढा व वरील कल्क सर्व एकत्र करून पुन्हां तितक्याच तेलासह कढवून गाळून ठेवावें. ह्या तेलाच्या उपयोगानें नेत्रपीडा, मस्तकशूळ, श्लीपद, आमवात, हृदयपीडा, अंडवृद्धि, गलगंड, सूज, बधिरता, उदररोग, कफयुक्त खोकला हे सर्व जातात. ह्याची परिक्षा-हें दूर्वांवर टाकलें असतां दूर्वा वाळतात. असें झाल्यास हें तेल उत्तम समजावें.

## २४ मुखरोग.

१ घशांत दुखतें त्यास— पिकलेल्या बेलफळाचा भाजून गर काढून गूळ घालून खावा. किंवा पानांचा रस दुधांतून २ तोळे घ्यावा. पित्तेवेळीं गूळ एक तोळा घालून कोमट असा घ्यावा. दि० ३ दोहीं वेळां.

२ तोंड आलें, लाळ गळूं लागली, तोंडांत चट्टे पडल्यास बेल-फळाचा काढा चौथाई करून, त्याच्या गुळण्या रोज २।३ वेळ कराव्या. दि० ३।५।७

## २५ मूत्ररोग.

१ बेलाच्या झाडाचें व बाहव्याच्या झाडाचें मूळ ह्यांचा काढा थंड करून ३ दिवस सकाळ संध्याकाळ प्यालयानें मूत्रकृच्छ्ररोग जातो.

२ मुतखडा व मूत्रशर्करा यांस— तीळ, अघाडा, मुळा, केळीचा कांदा, पळसाची साल व बेलाच्या झाडाची साल, यांचा काढा बकऱ्याच्या मुतांत करून प्यालयास मुतखडा जातो. दि० ३। ७

३ मूत्राघात, वातकुंडलीस— बेलमूळादि दशमूळें यांच्या काढ्यांत शिलाजीत व साखर घालून घेतल्यास वातकुंडली, व मूत्राघात हे नष्ट होतात. दि० ७। १४

४ बेलमूळ व बाहव्याचें मूळ समभाग काढा करून थंड झाल्यावर प्यावा. दि० ३ मूत्रकृच्छ्ररोग जातो. रात्रीं निकाढा घ्यावा. पथ्य ताकभात.

## २६ मूळव्याध.

१ बेलाच्या पानांचा रस मिऱ्यांची पूड घालून घावी. दि ७ दोहीं वेळां.

२ नुसत्या बेलाच्या पानांचा रस रोज २। ३ तोळे सकाळ-संध्याकाळ ७। १४ दिवस प्याल्यास मूळव्याध जाते.

३ कुडयाची साल, बेलफळ, चित्रक, सुंठ, अतिविष, धमासा, दारुहळद, हीं मूळव्याध नाशक असल्यामुळें त्याच्या उपयोगानें मूळव्याध जाते.

४ धमासा, बेलफळ, ओवा, सुंठ, यांपैकीं कशाचा ही काढा-निकाढा घ्याल्यानें मूळव्याध जाते. दि० २१

५ बेलफळांतील गीर, सुंठ, पिंपळी, वावडिंग, दंतीमूळ, कचो- रा, हिरडा निशोत्तर ( नळीतेड ) हीं सर्व समान घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून त्यासमान गूळ घालून २ तोळेप्रमाणें खावें, मूळव्याध जाते. दि० ७। १४ दोहीं वेळां.

६ रक्ती मूळव्याध— नित्य कच्चे बेलफळांतील गर, लोणी, एकत्र वाटून खावें. रोज ३ वेळ. रक्ती मूळव्याध लवकर जाते.

## २७ मेदोरोग.

१ बेलमुळाची साल, अयनाची साल, टेंटूची साल, पाडळीची साल, शिवणीची साल यांच्या काढ्यानिकाढ्यांत मध घालून दिल्यास मेदोरोग जातो. दि० ७। १४ दोहीं वेळां

२ मेदोरोगास — बेलमूळाची साल, एरणमूळ, टेंटूमूळ, शिवण- मूळ, पहाडमूळ, या पांच बृहत्पंचमुळांचा काढा अष्टमांश करून त्यांत मध घालून प्यालें असतां मेदोरोग ( शरीर व पोट यांतील फुगवटी ) जाते व शरीर रोड होतें. दि० २१ सकाळसंध्याकाळ घेणें. ऊन पाणी प्यावें.

३ मेदोरोगांतील अंगाची दुर्गंधि जाण्यास— बेलाचीं, बाभ- ळीचीं, कडूनिंबाचीं पानें वाटून अंगास रात्रीं उटणें लावून सकाळीं साबण लावून धुवावें. दि० १५।२०

४ बेलमूळ, थोरएरणमूळ, पाडळमूळ, शिवणमूळ, टेंटूमूळ, ह्यांचा काढानिकाढा निवाल्यावर मध घालून प्याल्यानें मेदोरोग जातो. दि० ७। १४

## २८ रक्तपित्त.

१ रक्तपित्त असून शिवाय आमांश झालेल्यास-बेलफळ,वेखंड, व बडीशेप यांचा काढा द्यावा. दि० ७। १४ दोहीं वेळां हें फार उत्तम औषध आह.

## २९ वातरक्त.

१ बेलमूळ आदिकरून दशमुळांच्या काढ्यांत गाईचें दूध सिद्ध करून दोहीं वेळां घेतल्यास वातरक्तसंबंधीं पीडा लवकर जाते. दि० २१।४०

## ३० वातरोग.

१ शरीरगत वातास— कोंवळ्या बेलफळाचा अष्टमांश काढा करून गूळ घालून घ्यावा. सकाळसंध्याकाळ. दि० २१-३० सर्व शरीरगत वात जातो.

२ हृदयाची धडधड, उदासीनता, निद्रानाश आणि वेडेपणा ह्या वातरोगास- बेलमुळाच्या सालीचा अष्टमांश काढा निवाल्यावर मध घालून सकाळीं द्यावा. काढा आकृतिप्रकृतींचा विचार करून १ ते ४ तोळे द्यावा. जास्त झाल्यास कैफ येतो. दि० ७ । १४ । २१ रोगमानाप्रमाणें. पथ्य-दूध, तूप, भात, साखर.

३ जाळवातास - तिळांच्या तेलांत बेलफळाचा मगज खलून १५ दिवस ठेवून तेल गाळून अंगास लावावें किंवा खलून रात्रीं पायास, अंगास, हातास, जाळवात असल्यास लावून फडकें बांधून निजावें. सकाळीं साबणानें स्वच्छ धुवावें. याप्रमाणें १५ दिवस केल्यास उत्तम गुण येतो.

४ धनुर्वातास – बेलमूळ, रिंगणी, डोरलीमुळें, एरंडमूळ, पादेलोण, महाळुंगमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, सैंधव यांचा काढा दिला असतां धनुर्वात जातो.

५ धनुर्वातास – बेलाची साल ( झाडाची ), एरंडमूळ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, महाळुंग

सैंधेलोण, यांचा काढा दिला असतांना धनुर्वातास चांगला आहे.

६ गृध्रसी, खंजवात, पंगु यांस— बेलादि दशमूळें, चिकणा-मूळ, रासना, गुळवेल, व सुंठ यांच्या काढयांत एरंडेल एक किंवा दीड तोळा घालून प्याल्यानें चांगला गुण येतो. दि० ७ । १४

७ बेल, टेंटू, शिवण, पेरण, पहाड, ह्यांचीं मुळें; रासना, पोखर-मूळ, कुळथ्या, ह्यांचा काढा घ्यालें असतां शिरःकंपवात व हनुस्तंभ हे जातात. दिवस १४ । २१

८ मोठीं पंचमूळें, बेल, शिवण, टेंटू, पहाड, पेरण व चिकणा ह्यांच्या अष्टमांश काढयांत दूध घालून फक्त दूध उरेपर्यंत कढवून गाळून प्यावें. दि० २१ वातरोग जाऊन प्रकृती चांगली होते.

## ३१ वांति ( छर्दि ) बंद करणेस

१ वेलाच्या झाडाची साल व गुळवेल ह्यांच्या अष्टमांश काढयांत मध घालून प्याल्यास वांति बंद होते. दि० ३ दोहीं वेळां. त्रिदोषज वांतिही राहते.

२ बेलफळाचा गर व आवळकाठी यांच्या काढयांत मधसाखर घालून घेतल्यानें वांति लवकर राहते.

३ बेलफळाचा गर व सुंठ यांच्या काढयानें वांति राहते. बेलफळाचा गर, सुंठ, कायफळाचा अष्टमांश काढा पाजल्यानें वांति लवकर राहते.

४ वांति व अतिसारास— पिकल्या बेलफळाचा गर व आंब्याच्या कोईंतील मगज एकत्र वाटून त्यांत मध व साखर घालून दरताशीं २ । ३ वेळ द्यावें.

५ त्रिदोषज वांतीस— बेलफळाच्या सालीचा अष्टमांश काढा,

मध व सुंठीची पूड १ मासा व लवंगांची पूड २ गुंजाभार घालून पाजावा.

## ३२ विष.

१ उंदीराचे विषास-बेलाचें मूळ, काकोलीमूळ, (काकोलीमूळ मिळत नाहीं, त्याजबद्दल आस्कंद घ्यावा.) विष्णुक्रांतिमूळ, तिळाचें मूळ हें समान घेऊन चूर्ण करून मध तुपांतून पावतोळा खावें. उंदराचें विष जातें. दि० ३ । ७

२ सर्पविषास — बेलाच्या झाडाचें मूळ, कवठाच्या झाडाचें मूळ, तांदुळज्याचें मूळ यांचा रस ३ तोळे काढून द्यावा व काळोखांत निजवावें. उतार पडल्यास जलदी करून १ तासाच्या आंत आणखी एकदां पाजावा.

३ किरडूं, उंदीर व विंचू, यांच्या विषास — बेलाच्या झाडाचें मूळ पाण्यांत उगाळून लेप द्यावा.

४ उंदराचे विषास— कडूवृंदावनाचें मूळ, बेलमूळ, काकोली (हिच्या अभावीं आस्कंद घ्यावा) तिळाचें मूळ ह्यांच्या चूर्णात साखर, मध, तूप मिळवून खावें. म्हणजे उंदराचें विष जातें. दि० ३ । ७ पथ्य दूध व भात.

५ बेलफळ व तुळस, डाळिंब, मनुका, अश्वगंधी व शेवग्याचा डिंक हें सर्व समान घेऊन चूर्ण करून मधांतून चाटवावें. सर्व प्रकारचें विष व मंडलीसर्पाचें विष नष्ट होतें.

## ३३ विषूचिका.

१ बेलफळांतील गर, सुंठ, कायफळ, यांचा काढा अष्टमांश करून १ । १ तासानें पाजावा यानें पटकींतील वांति लवकर थांबते.

२ जुलाब बंद होणेस— सुकलेल्या बेलफळांतील गराचें चूर्ण व जुना गूळ घेऊन त्याच्या सुपारीएवढ्या गोळ्या करून ऊन पाण्यांतून १।१ गोळी २।२ तासांच्या फेरानें द्यावी. म्हणजे मोडशीचे जुलाब बंद होतात. लहानमुलास त्याच्या वयमाना-प्रमाणें कमीअधीक द्यावी.

३ बेलाच्या पानांचा रस वयमानाप्रमाणें १ ते ४ तोळे पाजावा.

## ३४ विसर्प ( धांवरें ).

१ बेलाची साल, कडू पडवळ, धमासा, गुळवेल, अडुळसा, यांचा काढा पाजून अंगास लावावा. यानें विसर्प जातें. किंवा ताजा मध लावावा. दि० ३

## ३५ विस्फोट.

१ बेलमूळादि दशमूळें, त्रिफळा, गुळवेल, चिराईत, धमासा ह्यांच्या काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घेतल्यास विस्फोट व्याधी जातो. दि० १४।२१

## ३६ व्रण

१ व्रणावर बेलाचीं ताजीं पानें वाटून बांधावीं. ह्या पाल्याचा लेप चांगला गुणकारी आहे.

२ व्रणामुळें सूज आल्यास बेलाचीं पानें वाटून लेप द्यावा, व रस पाजावा.

३ बेलादि दशमूळांच्या काढ्यांत तूप घालून त्यानें व्रण धुवावे. म्हणजे लवकर भरतात.

## ३७ शूळ.

१ कफज शूळ लवकर जाण्यास— बेल, टांकळा, अडुळसा, चित्रक, ह्यांचीं मूळें, सुंठ, एरंडमूळ, ह्यांच्या काढ्यांत हिंग व सैंधव

घालून घेतल्यास कफज शूळ जातो. दि० ३ । ७ दोहीं वेळां.

२ बेलफळाचा गर, वाळा, काडेचिराईत, गुळवेल, धने, सुंठ, कुडेसाल, नागरमोथे, यांच्या काढ्यानिकाढ्यानें शूळ राहतो. दि० ३ । ७

३ कुक्षिशूळास— कोवळ्या बेलफळाचा काढा सुंठीचें चूर्ण व गूळ घालून प्यावा. दि० ३ रोज २ वेळां. यानेंच पोटशूळही जातो.

४ बेलफळाचा गोरावळा खाल्यानें पोटशूळ, आमशूळ, कुक्षिशूळ, रक्तातिसार, हीं जातात. दि० ३ । ५ । ७

५ बेलमूळ, एरंडमूळ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, महाळुंगमूळ, लकड्या पाषाणभेद, सुंठ मिरें, पिंपळी, ह्यांचा अष्टमांश काढा जवखार २ गुंजा भार, हिंग १ गुंजभार, एरंडेल १ तोळा घालून प्यावा. रात्रीं निकाढा घ्यावा, म्हणजे कठीणशूळ, कंबर, मांड्या, हृदय, शिश्न, स्तन यांतील शूळही जातो. दि० ३ । ७

६ बेलफळ, कुडा, नागरमोथे, अतिविष, वाळा ह्यांचा काढा निकाढा घ्यावा म्हणजे अंगशूळ व रक्तयुक्त जुना अतिसारही जातो.

७ धने, बेलफळांतील गीर, सुंठ, नागरमोथे, वाळा ह्या, पांच जिनसांचा काढानिकाढा घ्यावा. दि० ३ । ५

८ वातशूळास— बेलमूळ व एरंडमूळ, तीळ, समभाग घेऊन चूर्ण करून लिंबूरसांत घोटून ३ । ३ माशाच्या गोळ्या करून रिंगणीमुळाच्या काढ्यांतून घेतल्यास वातशूळ जातो. दि० ३ दोहीं वेळां

## ३८ श्वास ( दमा. )

१ दमा, श्वासास—बेलाच्या पानांचा अष्टमांश काढा मिऱ्यांचें चूर्ण घालून पाजावा. शौचास साफ होऊन कफ पडून बरें वाटतें.

२ बिल्वादि दशमूळांच्या काढ्यांत पोखरमूळीचें चूर्ण मिळवून प्यालयास श्वास, खोकला, व पार्श्वशूळ जातो.

## ३९ श्लीपद ( वारूळ )

१ बेलफळांतील गीर, देवदार, सुंठ, गुग्गुळ, गोमूत्रांत शिजवून गाळून ३ तोळे व तिळांचें तेल १ तोळा घालून प्यावें. दि० ७। १० दोहीं वेळां.

२ पिंपळी, वेखंड, देवदार, वसुची मुळी, बेलफळांतील गीर, प्रत्येक १।१ भाग म्हसवेल (वृद्धदारु) सर्वांबराबर घेऊन चूर्ण करून गोमूत्रांत खलून४।४गुंजा भाराच्या गोळ्या करून कांजींतून सकाळ संध्याकाळ घेतल्यास उग्र असा श्लीपद रोग जातो. दि० ७।१४

## ४० सूज.

१ बेलाच्या पानांचा रस २ तोळे काढून चिमटीभर मिऱ्यांची पूड घालून घेतल्यास त्रिदोषांनीं युक्त अशी ही सूज जाते. दि० ३। ५ दोहीं वेळां.

२ नुसत्या बेलाच्या पानांचा रस ३। ३ तोळे घेतल्यास रोज शौचास साफ होऊन ३ दिवतांत सूज उतरते.

३ बेलगीर, चित्रक, गुळवेल, नागरमोथे, तांबडाचंदन, नेत्रवाळा, इंद्रजव, याचा काडा निकाढा प्यालयास, सूज, ज्वरातिसार हीं जातात. दि० ३। ७

## ४१ संग्रहणी.

१ पिकलें किंवा हिरवें बेलफळ भाजून त्याच्या गरांत सुंठ, गूळ कालवून सकाळ संध्याकाळ खाऊन नुसतें ताक पिऊन राहिल्यास भयंकर संग्रहणी सुद्धां जाते.

२ बेलाचा गर, नागरमोथे, इंद्रजव, वाळा, मोचरस ह्यांचें चूर्ण करून बकरीच्या पावशेर दुधांत १।१ तोळा चूर्ण व अर्ध पावशेर

पाणी घालून कढवून पाणी आटल्यावर विग्रवून प्यावें. दि०३।५।७ सकाळीं सायंकाळीं. पथ्य ताक, भात. ह्यानें फार जुनी वाढलेली संग्रहणीही जाते. दूध पचेल त्याप्रमाणें कमजास्त घ्यावें.

३ आमसंग्रहणीस— कोवळें बेलफळ, बडीशेप, व सुंठ यांचा अष्टमांश काढा गूळ घालून प्यावा. दि० ७।१४ दोहीं वेळां. पथ्य ताकभात, ऊन पाणी.

४ नागरमोथे, टेंटूमूळ, सुंठ, धायटीचें फूल, नेत्रवाळा, बेलफळांतला गीर, मोचरस, पहाडमूळ, इंद्रजव, कुडयाची साल, आंब्याच्या कोयींतील गर, अतिविष, मंजिष्ठ,सर्व समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करावें. हें मधांतून १।२ मासे प्रमाण खलून, तांदुळाच्या धुवणांतून सकाळ संध्याकाळ घ्यावें. म्हणजे संग्रहणी, भयंकर अतिसार ह्या प्रवाहिकाही लवकर नष्ट होतात.

५ त्रिदोषसंग्रहणीस— बेलफळांतील गर, सुंठ, गूळ, समान घेऊन दिवसांतून ३।४ वेळां खाऊन फक्त ताकभाताचेंच पथ्य केल्यास संग्रहणी रोग जातो. दि० १४।२१।३०

६ दुःखदायक संग्रहणीस- चव्य, चित्रक, बेलगीर, सुंठ, समभाग चूर्ण पावतोळा घेऊन ताकांतून प्यावें. असाध्य संग्रहणी जाते. दि० २१ दोहीं वेळां.

७ वातसंग्रहणीस— धने, बेलफळांतील गीर, चिकणामूळ, सुंठ, सालवण; ह्यांच्या काढ्यांत तांदूळ शिजवून ताकांतून खावें. असें केलें असतां वातसंग्रहणी जाते. दि० २१ दोहीं वेळां.

८ कच्या बेलफळांतील गर शिजवून मधांतून कालवून चित्रकाचें चूर्ण ८ गुंजा भार ताकांतून घेतलें म्हणजे संग्रणी जाते. दि० २१ दोहीं वेळां.

९ कच्च्या बेलफळांतील गर, सुंठ, धायटीचें फूल,चिकणामूळ

नागरमोथे यांचा काढा त्यांत तांदळाची कणी शिजवून ताकांतून घ्यावें. संग्रहणी जाते. दि० १४ । २१

## ४२ स्त्रीरोग.

१ बेल व माका ह्यांचें बीजं वाटून मद्यांतून ( दारूंतून ) पाजल्यास स्त्रियांचा योनिशूळ जातो.

२ गर्भिणीच्या वातज्वरास – बेलमूळ, टाकळामूळ अथवा सुंठ, पाडळमूळ यांचा काढा थंड करून पाजावा अथवा वरील औषधांचें चूर्ण आधण पाण्यांत घालून पाणी निवाल्यावर अर्ध्या अर्ध्या तासानें पाजावें. गर्भिणीचा वातज्वर जातो. दि० ३। ७

३ गर्भिणीचे वांतीस – वेलफळ किंचित् दुखवून भाजून त्याचा गर भाताच्या लाह्यांचे मंडांत घालून त्यांत चिमटीभर सुंठीची पूड घालून पाजावें.

४ गर्भिणीचे अतिसारास – कोवळें बेलफळ ४ भाग, जायफळ १ भाग, मुरडशेंग २ भाग पाण्यांत वाटून गाळून, पाणी ४ । ५ वेळ पाजावें. दि० ३ दोहीं वेळां.

५ सूतिकारोग – ( बाळंतरोग, ) – बेलफळांतील गीर, सैंधव, नागरमोथे, सुंठ, धायटीचें फूल, लोध्र, कुडेसाल, मोच-रस, पहाडमूळ, इंद्रजव, नेत्रवाळा, आंब्याच्या कोईंतील मगज, अतिविष व लाजाळू. हें सर्व समान घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून तें तांदळांच्या धुवणांतून मध घालून पाव तोळा चूर्ण दरवेळीं घतल्यानें सूतिका रोग, प्रवाहिका, अतिसार, संग्रहणी यांचा नाश होतो. हें बाळंत रोगावर चांगलें आहे. दि० १४। २१। ४२ पथ्य दूध, भात, ऊनपाणी.

६ सूतिकारोग ( बाळंतरोग ) – दशमूळें ( बेलमूळ, टेंटू, ऐरण, शिवण, पहाडमूळ, ह्या मुळांवरील साल, लघुपंचमूळें

( सालवण, पिठवण, रिंगणी, डोरली, गोखरू, ह्यांचीं मुळें घ्यावीं व काढा करावा. ) काढ्यानिकाढ्यांत मद्य ( दारू ) मिळवून घेतल्यास बाळंतरोग हटकून जातो. दि० २१ पथ्य दूध भात, ऊन पाणी. किंवा तूप घालून ही घेतल्यास अथवा खडीसाखर घालून घेतल्यास लवकर गुण येतो.

७ गर्भाशय शुद्ध होणेस– बेलादि दशमूळें, कमळ, कोष्ट, वाळा, तगर, शेवती, एरंडमूळ ह्यांच्या काढ्यानिकाढ्यांत गायीचें दूध घालून कढवून निवाल्यावर मध किंवा साखर घालून प्यालें असतां गर्भस्थानांतील सर्व दोष जावून शुद्ध होतो. दि० ७। १४

८ सर्व प्रकारच्या प्रदरास— बेलफळांतील गीर, रसवंत ( दारुहळदीच्या काढ्यांत गाईचें दूध, किंवा शेळीचें दूध घालून आटवून केलेला शुद्ध बिबा ), नागरमोथे, काडेचिराईत, अडुळ-शाचीं पानें, यांचा काढानिकाढा थंडझालेवर मध घालून प्यावा. म्हणजे शूळयुक्त, पिवळा, पांढरा, काळा, तांबडा प्रदर (विटाळ ) नष्ट होतो. दि० ७। १४ पथ्य दूध भात.

९ पांढरा प्रदर ( श्वेतप्रदर )– बेलफळांतील गीर, रसवंत, ( वरील ८ अंक पहा. ) काडेचिराईत, अडुळसा, नागरमोथे, तांबडा चंदन, सूर्यफूल यांच्या काढ्यानिकाढ्यांत निवाल्यावर मध घालून प्याल्यास पीडायुक्त श्वेतप्रदर जातो. दि० ७।१४

१० स्त्रियांचा योनिशूळ, गुल्म, मूळव्याध, प्लीहा, हृदयशूळ, पार्श्वशूळ यांस – बेलाची साल, सुंठ, पिंपळी, कलोंजीजिरें, चवक, चित्रक, डाळिंबांतील दाणे, चिंच, वेखंड, आम्लवेतस, पांढरो वसु, पादेलोण, जिरें, महाळुंगाची साल, सर्व समान घेऊन २० तोळे पाणी घालून वाटून औषधाचे समान तूप घेऊन त्यांत चौपट दहीं मिळवून शिजवून तूप उरल्यावर गाळून ठेवन

वरील रोगावर उपयोग करावा. दरवेळीं २ तोळे औषध खावें. वरील सर्व रोग जातात. दिवस १४ । २१ । ३०

## ४३ हृद्रोग.

१ बेलाच्या झाडाची साल, महाळुंगाच्या मुळाची साल, पाषाणभेद, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, हीं सर्व १ । १ भाग व एरंड-मूळ ८ भाग, सर्व एकत्र कुटून त्याच्या अष्टमांश काढ्यांत गोमूत्र ५ तोळे घालून कोमट असा प्यावा; पितेवेळीं बीडलोण, पादेलो-ण ५ । ५ गुंजाभार घालून प्यावें. दि० ३ । ५ सकाळीं एकच वेळ. हा उपाय हृद्रोगावर चांगला आहे.

२ बेलादि दशमूळांच्या काढ्यांत सुंठीचें चूर्ण घालून प्याल्यानें हृद्रोग, कफजपांडुरोग, ज्वर, अतिसार, सूज, संग्रहणी, खोकला, अरुची व कंठरोग हे जातात. दि० ३ । ७ । १४ दोहीं वेळां.

३ बेलादि दशमूळाच्या काढ्यांत सैंधव आणि जवखार घालून प्याल्यानें हृद्रोग लवकर जातो. दि० ७ । २१

४ बेलाची साल, भारंगमूळ, पोखरमूळ, रास्ना, अजवान, सुंठ, दशमूळें, पिंपळी, समान भाग घेऊन अष्टमांश काढा निकाढा घेतल्यास सन्निपातज्वर, पार्श्वशूळ, आनाह, कास, श्वास, अग्निमांद्य, निद्रा, हीं जातात.

## ४४ क्षयरोग.

१ बेलमूळादि दशमूळें, पिंपळी, धने, सुंठ, यांच्या काढ्या-निकाढ्यांत चतुर्जात (दालचिनी, तमालपत्र, वेलची, नागरमोथे) ह्यांचें चूर्ण दीड ते तीन मासे घालून घेतल्यास क्षय, खोकला, क्षयांतील ज्वर व इतर उपद्रव कमी होऊन बल व पुष्टी येते. दि० २१ पथ्य तूपरोटी, साखर, दूधभात, तूप.

२ बेलमूळादि दशमूळें, रास्ना, चिकणामूळ, पोखरमूळ, देवदार, सुंठ यांचा काढानिकाढा प्याल्यानें क्षय, पार्श्वशूळ, मस्तकरोग, खोकला हीं जातातात. दि० ७ । १४ । २१

## ४५ क्षुद्ररोग.

१ अंगाची व कांखेंतील दुर्गंधी जाणेस— बेलाच्या पानांचा रस चोळावा. नुसत्या पानांचा न निघाल्यास पाण्यांत वाटून काढावा.

## ४६ वीर्यस्तंभन.

१ धातुपुष्टतेस— गाईच्या दुधांत बेलाच्या झाडाच्या सालीचा रस दरवेळीं २ तोळे घालून जिन्याची पूड पाव मासा, साखर १ तोळा घालून प्यावें. दि० ७ । १४

२ वीर्यस्तंभनास— बेलाचीं पानें वाटून पाण्यांत कालवून गाळून तें पाणी ५ तोळे घेऊन त्यांत जिऱ्याची पूड ·।· तोळा, खडीसाखर १ तोळा घालून पाजावें. दि० ७ दोहीं वेळां.

३ वीर्यस्तंभनास— पातळयंत्रानें बेलफळाचा अर्क काढून दरवेळीं दुधांतून २ तोळे घ्यावा. दि० ७ । १४ दोहीं वेळां

४ वीर्यस्तंभनास— बेलमुळाची अंतरसाल, जिरें ·॥· तोळा वाटून तूपसाखरेंतून सकाळ संध्याकाळ द्यावें. दि० १४ । २१ वीर्यवृद्धीस याचेवर दूध शक्तिमानाप्रमाणें प्यावें.

# अनुक्रमणिका.

# चिकित्साप्रभाकर

## आवृत्ती २ री.

चिकित्सा प्रभाकर या वैद्यक ग्रंथाची पहिली आवृत्ती २००० प्रती संपून १ वर्ष झालें. ग्रंथाबद्दल पुष्कळ मागण्या आल्यामुळें ही दुसरी आवृत्ती शुद्ध करून वाढवून, मनुष्यदेहाचीं सुमारें ८५ चित्रें घालून पूर्वीप्रमाणेंच उत्तम कापडी बाइंडिंगची तयार केली आहे. सांचा पूर्वीप्रमाणेंच डेमी अष्टपत्री असून कागद चांगला पांढरा चिवट ३२ रत्तली घातला आहे. पृष्ठें सुमारें १६०० असूनही किंमत पूर्वीप्रमाणें १० रुपयेच ठेविली आहे. पुस्तक ४ भागांचें एकत्र बांधलें आहे. पुस्तक मोठें असलेमुळें टपालखर्च १ रुपया पडतो. पुस्तकासंबंधीं केसरी, ज्ञानप्रकाश, महाराष्ट्र आदि वर्तमानपत्रें, पुरुषार्थादि मासिकें, प्रख्यात वैद्य, डॉक्टर वगैरे लोकांचे पुस्तकाच्या चांगलेपणाबद्दल व सुलभपणाबद्दल पुष्कळ अभिप्राय आले आहेत. पैकीं वाचण्यास कंटाळा न यावा म्हणून मुख्य मुख्य तेवढेच पुढील पानांत दिले आहेत. इतर पुष्कळ लोक व खेडयांतील मास्तर, या सुलभ व सोप्या मराठी भाषेंत हें पुस्तक लिहिलें असलेमुळें याच्या सहाय्यानें खेडयांतील आरोग्य संभाळून मान मिळवूं लागले आहेत व खेडयांतील लोकांच्या आर्थिक मदतीनें त्यांचा प्रपंचही सुखाचा झाल्याचीं पत्रें आलीं आहेत. दुसरी आवृत्ती तयार झाली आहे; करितां ११ रुपयाची मनीऑर्डर आल्यास पुस्तक रजिष्टर करून पाठवूं. व्ही. पी. नें मागितल्यास घेणारास व आम्हांस अधिक

खर्च येऊन एखाद्यानें व्ही. पी. न घेतल्यास पोष्टखर्च रु. १ आमच्यावर बसतो. सबब रु. १०, पाठवून रेल्वे स्टेशन कळवावें व पत्ता स्पष्ट लिहावा म्हणजे रेल्वेपार्सल करूं. अथवा ५ पुस्तकें खपविल्यास १ पुस्तक फुकट पाठवूं.

प्रभाकर बाळाजी ओगले,
पो. ओगलेवाडी, जि. सातारा.

## या ग्रंथावरील कांहीं अभिप्राय.

(१) रा० रा० प्रभाकर बाळाजी ओगले राहणार ओगलेवाडी यांनीं चिकित्सेच्या हस्तलिखित पुस्तकाचे १७ भाग वाचण्यासाठीं आणले ते सर्व वाचून अतिशय समाधान झालें. त्यापैकीं आयुर्वेदाच्या ग्रंथांची यादी पाहून आयुर्वेदाच्या ज्ञानभांडाराबद्दल आदर उत्पन्न होतो. एकंदरींत रा० रा० ओगले यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक ग्रंथ लिहून जनतेपुढे मांडला आहे.

डॉ० विष्णु बळवंत भिडे. वैद्य नारायणशास्त्री मराठे, सातारा.

(२) आपला चिकित्साप्रभाकर हा लिहिलेला ग्रंथ वाचून पाहिला. अलीकडे या नमुन्याचा वैद्यक ग्रंथ मराठींत झालाच नाहीं. या ग्रंथांतील ज्वरप्रकरण, स्त्रीरोग, बालरोग, क्षुद्र रोग, वगैरेसंबंधीं माहिती इतर कोठेंही न पाहण्यांत आलेली अशी दिलेली असल्यानें हा ग्रंथ प्रत्येक व्यक्तीनें संग्रह करणें अवश्य आहे.

आण्णाशास्त्री आबाशास्त्री आराध्ये, वैद्य.
आयुर्वेदाश्रयी- सदाशिव आ० आराध्ये. कोल्हापूर,

(३) आपण मोठ्या प्रेमानें पाठविलेला "चिकित्सा-प्रभाकर" ग्रंथ वाचून पाहिला. आपली मेहनत फार दिसते. यांत लिहिलेली माहिती म्हणजे औषधोपचार करूं लागण्यापूर्वी वैद्याला आवश्यक लागणाऱ्या माहितीची पूर्व तयारीच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. डॉ० ग० पां० काळोखे, चर्नीरोड, मुंबई.

( ४ ) " चिकित्सा प्रभाकर " ( किंमत १० रु० ) या ग्रंथाचा उपयोग केवळ वैद्यांनाच आहे असें नसून रोगनिवारण व रोगप्रतिबंध करूं इच्छिणाऱ्या खेडयांतील शाळामास्तर व इतर सद्गृहस्थ यांनांही प्रस्तुत पुस्तकाचा उपयोग व्हावा असा असून तदनुसार ग्रंथकारानें ग्रंथाची योजना व मांडणी केली आहे.

वैद्य गोपाळशास्त्री गोडबोले, नागपूर.

( ५ ) वनस्पतिकोश, वैद्यकग्रंथकोश, पदार्थ गुणदोष, विविध वैद्यक विषय, रोगलक्षणें, त्यांचीं आंगें, उपांगें व त्यावरील उपाय, सिद्धौषधी, तंत्र वैद्यक, औषधें, भस्में, यंत्रें, वगैरे आर्यवैद्यकीय गोष्टींचा या ग्रंथांतून सूक्ष्म ऊहापोह असल्यानें आर्यवैद्यकज्ञानकोश हें नांव शोभेल. हा ग्रंथसमुच्चय खरोखरीच आयुर्वेदाभिमान्यांनीं जवळ बाळगण्यासारखा आहे, अशी आह्मी शिफारस करतों.

डॉ. श्री. व्यं. केतकर, एम्. ए, पीएच. डी, पुणें.

( ६ ) आज वैद्यकी करणाऱ्या लोकांत पुष्कळ लोक असे असतात कीं त्यांना मूळ शास्त्राची असावी तशी माहिती नसते, अशांना हें पुस्तक अत्यंत उपयुक्त व संग्राह्य आहे. औषधी योजना करणेस कांहीं तरी शास्त्रशुद्ध पाया असणें जरूर असतें, असा शास्त्रशुद्ध पाया वैद्यांनाच काय पण साधारण माणसासही अवगत व्हावा अशी या पुस्तकांत उत्कृष्ट रीतीनें योजना केली आहे. पुस्तक फारच परिश्रमपूर्वक व सर्वांना समजेल अशा सुलभ पद्धतीनें व सोप्या भाषेंत लिहिलें आहे.

ज्ञानप्रकाश, ( ता. २ । १ । २७ )

( ७ ) ओगलेशास्त्री यांनीं हा ग्रंथ मोठया परिश्रमानें तयार करून त्यांनींच प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें केवळ वैद्यांनाच नव्हे तर सुशिक्षित लोक, साधारण शिकलेल्या स्त्रिया व खेडयां-

तील साधारण शिकलेले लोक यांस लहानसहान रोगांवर काय, पण मोठमोठे कठीण रोगांवरही खेडयापाडयांतील अगदीं सहज मिळणाऱ्या औषधांचा अनुभविक उपयोग सोप्या भाषेंत लिहून उपकृत केलें आहे.

केसरी ( ता. १९ । ४ । २७ )



# निंबप्रभाव

## आवृत्ति दुसरी

हिंदुस्थानांतील देशी भागांत प्रत्येक खेडयांत कडु निंबाचीं झाडें आहेतच. पण त्याचा उपयोग आरोग्याच्या कामीं व औषधाचे कामीं उपयोगी पडणारे कोणचे कोणचे महत्त्वाचे गुण आहेत, हें माहीत नसल्या कारणानें लोकांस अशा कल्पतरूप्रमाणें उपयोगी पडणाऱ्या वृक्षाचा उपयोग कसा करावा, हें या पुस्तकांत सांगितलें आहे. या पुस्तकांत निरनिराळ्या ५४ रोगांवर २७८ प्रयोग सांगितले आहेत. त्यांचा उपयोग खेडेगांवांतील पाटील, कुलकर्णी, शाळामास्तर व इतर लिहितां येणाऱ्या लोकांस करून घेतां येईल असा भरंवसा आहे. किंमत ४ आणे. पो० ख० ०८॥ ४॥ आण्याचीं तिकिटें पाठवून पुस्तक मागवा दहा प्रतिशिवाय व्ही. पी. होत नाहीं.

प्र. बा. ओगले,
पो. ओगलेवाडी, जि. सातारा.

# करंजोपयोग.

लेखक—

**प्रभाकर बाळाजी ओगले.**

( चिकित्सा--प्रभाकर, सुलभौषधि प्रभाकर, निंबप्रभाव, तुलसीप्रताप, बिल्वमहत्त्व व बाभळीचा उपयोगकर्ते )

मुक्काम ओगलेवाडी, सं. औंध, जि. सातारा.

शके १८५५.

सन १९३३

किंमत ३ आणे.

# प्रस्तावना.



हिंदुस्थानांतील सर्व भागांत करंजवृक्ष आढळतात. जंगलांत व इतर ठिकाणींहि बीं पडून आपोआप उगवून सहज वाढून फलद्रूपही होतात. त्यांची छाया थंड व दाट असल्यामुळे सडकेच्या बाजूस हीं झाडें मुद्दाम लावतात. ह्या झाडांस आपल्या खाद्य पदार्थांतील 'करंज्या' प्रमाणेंच आकाराचीं फळें येतात; म्हणूनच ह्या वृक्षास 'करंज' वृक्ष, हें सयुक्तिक नांव पडलें असावें. खेड्यांत गोरगरिबांच्या घरीं करंजाचे तेलाचाच दिवा लावण्याचा प्रघात होता. कारण करंजाच्या बियांत तेल पुष्कळ निघतें व फुकट मिळतें, यामुळें तें फार स्वस्त विकलें जातें;पण हल्लीं राकेल व कांचेच्या चिमण्या मिळूं लागल्यापासून पणत्यांतील दिवे लावण्याची चाल व करंजेल हीं मागें पडलीं. असो; ह्या झाडाचीं मुळें, साल, पानें, फुलें, फळें, या सर्वांपासूनच फुकट असे औषधी उपयोग खरूजखांडकापासून मोठ्या भयंकर अशा कुष्टरोगासारख्या व इतरही रोगांवर कसा होतो हें या लहान पुस्तकांत अनेक ग्रंथाधारें व स्वतःच्या अनुभवानें विशद करून ४७ रोगांवर १६७ प्रयोग दाखविले आहेत. त्या या फुकट मिळणाऱ्या औषधांचा सुज्ञांनीं व खेड्यांतील पाटील, कुलकर्णी, स्कूलमास्तर, वैद्य व डॉक्टर व इतर कुटुंबवत्सलांनीं अवश्य उपयोग करून घ्यावा, अशी विनंति आहे.

औंगलेवाडी,
मिती माघ शु॥ १५
शके १८५४.



प्रभाकर बाळाजी ओगले.

# अनुक्रमणिका.



# चिकित्साप्रभाकर.

हा ग्रंथ म्हणजे ग्रंथकाराच्या सतत ४० वर्षे केलेल्या श्रमांचें फळ असून यांतील विविध रोगांची मीमांसा व औषधयोजना, स्वानुभव, उपलब्ध वैद्यक विषयावरील ग्रंथ, जुनीं हस्तलिखित बाडें, सिद्धौषधींसंबंधी मिळविलेली माहिती यांचे आधारें लिहिला आहे. " चिकित्साप्रभाकरानें वैद्यक विषयावरील ज्ञानभांडारांत अमूल्य भर टाकिली आहे " हा या विषयावरील तज्ज्ञ वैद्य व डॉक्टर वगैरेंचा अभिप्राय अक्षरशः खरा असल्याचें आपणांस ग्रंथाचें एकवार निरीक्षण केल्यानंतर आढळून येईल. सुधारून मनुष्यदेहाचीं ८५ चित्रें घातलेली आवृत्ति २ री. किं. १० रु. ट. ख. १ रु.

## ग्रंथाची मांडणी.

कोणाही सुशिक्षित स्त्रीपुरुषास सहज समजेल इतक्या सोप्या भाषेंत हा ग्रंथ लिहिला असून विषयांची मांडणीही तितकीच सुगम केली आहे. लहानमोठ्या सर्व रोगांची चिकित्सा कोशाप्रमाणें अक्षरविल्हेवारीनें केली असल्यानें कोणत्याही रोगाची माहिती सहज शोधतां येते. तसेंच निरनिराळ्या रोगांवरील औषधयोजना, औषधें तयार करण्याच्या कृती, वजनें-मापें, औषधें घेण्याचें प्रमाण व अनुपानें यांची माहितीही जेथल्या तेथेंच दिली आहे. वनस्पति ओळखण्यास सोपें जावें म्हणून त्यांची मराठी, कानडी, हिंदी वगैरे भाषांतील प्रचलित नांवें, उत्पत्तिस्थानें व वर्णन दिलेला स्वतंत्र वनस्पति कोश या ग्रंथांत दिला आहे. आर्य वैद्यकावरील सुमारें ९०० ग्रंथांची यादीही दिली आहे.

## ग्रंथांतील विशेष.

कोणताही रोग होण्यापूर्वी प्राथमिक काळजी घेतली असतां पुष्कळ वेळां रोगांचें निवारण होऊन पुढें होणाऱ्या शारीरिक यातना व अट्टाहास टाळतां येतात. यासाठीं, दिनचर्या, व्यायाम, आहार, निद्रा व आरोग्याविषयीं नियम दिलेले आहेत. शिवाय प्लेग, कॉलरा, इन्फ्ल्युएंझा, वगैरेसारख्या सांथीच्या रोगांचा प्रसार झाला असतां ताबडतोब आचरण्याचे प्रतिबंधक उपाय, रोग होण्याचीं कारणें, लक्षणें, औषधयोजना व पथ्याबद्दल

सविस्तर मीमांसा दिली आहे. प्रत्यहीं अनुभवास येणाऱ्या सर्प, विंचू, उंदीर इत्यादि विषारी प्राण्यांच्या दंशावर उपाययोजना सांगितली आहे. स्त्री व बालरोगांची चर्चा फारच सविस्तर व मार्मिक केली असून उपाय अत्यंत सोपे व व्यवहारांतीलच सांगितलेले आहेत.

## ग्रंथाचा उपयोग.

या ग्रंथांत वैद्य व डॉक्टर लोकांस पुष्कळच उपयुक्त व नवीन माहिती सांपडणार असल्यानें त्यांनीं याचा अवश्य संग्रह करावाच, पण प्रत्येक घरंदाज कुटुंबवत्सलाचे घरीं या ग्रंथाचें वास्तव्य म्हणजे प्रत्यक्ष वैद्याचेंच चिरकाल वास्तव्य' असल्यासारखें होऊन सामान्य रोगाचे औषधासाठीं बाहेर जाण्याचें मुळींच कारण पडणार नाहीं. स्वाभाविक सौजन्य व लज्जा यांमुळें स्त्रियांस होणारे लहानसहान विकार त्या लपवून ठेवितात व पुढें त्यांसच असाध्य स्वरूप प्राप्त होतें. या ग्रंथांत दिलेली स्त्रीरोग-चिकित्सा वाचून कोणाही लिहितांवाचतां येणाऱ्या स्त्रीस सुरवातीस घरगुती उपाय योजून पुढें होणाऱ्या दुष्परिणामास, घरांत, परसांत मिळ-णाऱ्या वनस्पतींनीच आळा घालतां येईल. वैद्यकविषयक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांस त्या विषयाचा सांगोपांग अभ्यास करण्यास या ग्रंथाइतकें उपयुक्त व सुलभ दुसरें साधनच सांपडणार नाहीं. या ग्रंथाचा विशेष उपयोग खेड्यापाड्यांतून शिक्षकाचें काम करणाऱ्या शाळामास्तरांसही उत्तम होईल. या ग्रंथाचा नीट अभ्यास करून लहान मोठ्या रोगांवर झाड-पाला व वनस्पति यांचे उपाय योजून खेड्यांतील लोकांवर उपकार व आपले मिळकतींत भरही टाकतां येईल व मान्यताही वाढेल.

## ग्रंथांतील विषय.

**प्रथम भाग**—प्रारंभीं वैद्य-शास्त्राच्या प्राचीन इतिहासासह विस्तृत प्रस्तावना दिली असून, सुमारें २५०० वनस्पतींचीं संस्कृत, मराठी, कानडी, हिंदी नांवें व त्यांचा आकार पानें, फुल, फळें यांचें सविस्तर वर्णन, उगवण्याचीं ठिकाणें वगैरे माहितीसह वनस्पतिकोश दिला आहे, त्यावरून कोणतीही वनस्पती ओळखण्यास अडचण पडणार नाहीं. त्यानंतर सुमारें ९०० वैद्यकशास्त्रांवरील लहानमोठ्या भारतीय ग्रंथांची यादी दिली आहे. नंतर औषधोपयोगी व इतर खाद्यपेय पदार्थांच्या गुण-

धर्मांचा कोश दिला असून श्रीमंत औंध संस्थानाधिपति व ग्रंथकार यांचीं छायाचित्रें दिलीं आहेत.

**द्वितीय भाग**—वैद्यलक्षणें, दिनचर्या, व्यायाम, भोजन, निद्रा वगैरे आरोग्यासंबंधी वागण्याचे नियम, ऋतुचर्या, नाडी वगैरे अष्टविध परीक्षा, वृद्धि, क्षीण दोषांचीं लक्षणें, औषधी गुणधर्म, औषधी द्रव्यांची परीक्षा, औषधें तयार करण्याची कृति, पंचकर्में, स्नेहन, स्वेदन, बस्तिविधि व वमन, विरेचन, त्रिदोषांचा प्रकोप व शमन आणि हल्लीं चालू असलेल्या उपचारपद्धति वगैरेंची सविस्तर माहिती दिली आहे.

**तृतीय भाग**—अजीर्णापासून क्षयरोगापर्यंत • लहानमोठ्या सर्व रोगांचीं कोशाप्रमाणें अक्षरविल्हेवारीनें ९३ प्रकरणें देऊन, प्रत्येक रोगाचीं लक्षणें व इतर माहिती पोटभेदांसह देऊन त्यावरील औषधें जेथल्या तेथेंच दिलीं आहेत. त्यामुळें प्रत्येक रोगावर उपचार करणेस फार सोईचें होईल. शिवाय क्षुद्र रोग १३४ लिहून त्यांचीं लक्षणें व त्यावरीलही औषधें रोगाच्या खालींच दिलीं आहेत. स्त्रीरोग, बालरोग, उदरें, क्षय-रोग, मूळव्याध, मूत्ररोग, रक्तपित्त, कुष्टें, वगैरे सर्व भयंकर महारोगांची तर फारच बारकाईनें सप्रमाण लक्षणें देऊन त्यावरील हटकून गुण देणारीं औषधें लिहिलीं आहेत. लहान जंतूंपासून सर्प, विंचू वगैरे प्राण्यांच्या विषांवर व सोमल आदिकरून स्थावर विषांवरही सहज मिळणारीं, उतार पाडणारीं औषधें दिलीं आहेत.

**चतुर्थ भाग**—सिद्धौषधी प्रयोग व कल्प ( नागार्जुन, रेवणसिद्ध, गोरखनाथ, मच्छेंद्रनाथ, व कांहीं जैन साधू यांनीं सांगितलेले ) व तंत्र-वैद्यक ( तोडगे ) यांचीही माहिती दिली असून रसायनें तयार कर-ण्याच्या कृतीही दिल्या आहेत.

———

# सुलभ औषधी प्रभाकर.

तुमचे गांवांतच स्वयंभू औषधालयें दवाखाने, इस्पितळें आहेत हें तुम्हांस माहीत आहे काय? नसल्यास ( **सुलभौषधी प्रभाकर ग्रंथ** ) वाचून पहा म्हणजे सर्वच रोग घालविणारीं अमूल्य औषधें तुम्हांस सांपडतील व सर्व भागीं जेथें पहाल तेथें औषधालयेंच दिसतील; व त्या औषधी कोठें असतात हेंही त्या ग्रंथांतून सहज समजून येईल. शेंकडों वनस्पती दिसण्यांत क्षुल्लक परंतु फार महत्त्वाच्या असूनही त्यांचा उपयोग लोकांस माहीत नसल्यामुळें व्यर्थ जातात. त्यांचा औषधी उपयोग सर्वांस कळावा म्हणून या पुस्तकांत लहानसहान रोग व मोठमोठ्या गलितकुष्ठापासून ते क्षय, बाळंतरोगादि प्राणघातक रोगांवरही त्यांचा उपयोग कसा होतो हें खुलासेवार उघड करून दाखविलें आहे; व या पुस्तकांत वनस्पतिकोश प्रथम देऊन त्यांची संस्कृत, मराठी, कानडी, हिंदी, तेलंगू व इंग्रजी आणि इतर भाषेंतील मिळतील तितकीं नांवें लिहून हा ग्रंथ अगदीं सहज समजेल असा केला आहे. हा ग्रंथ सगळ्या लोकांस तर उपयोगी पडेलच पण वैद्य, डॉक्टर लोकांसही यांत पुष्कळ सोपी व बिनमोली वनस्पतींची माहितीहि मिळेल. पुस्तक डेमी अष्टपत्री सांच्याचें १००० पानांचें उत्तम कापडी बाइंडिंग केलेलें आहे. किं. ८ रु. ट. ख. ०१२

———

# सुलभ औषधी प्रभाकर.

## पूर्वार्ध व उत्तरार्ध.

**अभिप्राय केसरी** ता. ७।३।३३ अंक.

**ले. प्रभाकर बाळाजी ओगले, प्र. चित्रशाळा प्रेस, पुणें; किं. आठ रु.**

मराठी भाषेंत 'चिकित्सा प्रभाकर' हा नमुनेदार वैद्यक ग्रंथ लिहिणार श्री. प्र. बा. ओगले यांनीं प्रस्तुत ग्रंथ निर्माण केला आहे. आपलें आयुर्वैद्यक म्हणजे अमूल्य असें रत्नभांडार आहे. परंतु दुर्दैवानें विशेषतः आंग्लवैद्यकाचा या देशांत जास्त प्रादुर्भाव होत गेल्यानें हें जुनें रत्नभाण्डार दृष्टिपथाआड होऊं लागलें आहे व त्यामुळें पूर्वपरंपरा अबाधित चालेल असा दुवा स्मृतिनष्ट होतो कीं काय अशी साधार भीति वाटूं लागली आहे. परंतु अलीकडच्या राष्ट्रीय पुनरुद्धाराच्या उदयकालीं स्वाभिमानास पोषक अशा अनेक विद्यांचा पुनर्जन्म होऊं घातला आहे; अनेक देशाभिमानी गृहस्थ आपापल्या परीनें तसे उद्योग करीत आहेत. त्यांपैकींच श्री. ओगले यांचा अत्यंत स्पृहणीय असा हा उद्योग आहे.

'सुलभ–औषधी प्रभाकर' हा ग्रंथ सुमारें एक हजार पृष्ठांचा असून त्याचे दोन खंड करण्यांत आले आहेत. पूर्वार्धांत चार भाग आहेत व त्यांत वनस्पतींचा कोश दिला आहे; कोशांत वनस्पतींचीं मराठी, हिंदी, बंगाली, गुजराथी, कानडी, तामीळ, तेलगू, इंग्लिश व लॅटिन या भाषेंतील नांवें दिलीं आहेत. त्यामुळें हा कोश फार महत्त्वाचा व उपयुक्त झाला आहे. याखेरीज कांहीं वनस्पतींचा खुलासा या सदरांत वनस्पतींचें वर्णन व तीं सांपडण्याचें ठिकाण याचीं माहिती दिली आहे. नंतर सुमारें ५० औषधांच्या कृती दिल्या आहेत. पुढें त्रिदोषाबद्दल खुलासा देऊन औषधांच्या संज्ञा दिल्या आहेत. यानंतर रोगपरीक्षा कशी करावी याचें विवेचन करण्यांत आलें आहे.

उत्तरार्धांत सुमारें ८३ रोग व त्यांवर कोणती औषधयोजना करावी याची सुंदर माहिती दिली आहे. या ८३ प्रमुख रोगांच्या पोटांत असलेल्या अनेक उपरोगांची माहिती व त्यावरहि उपचार दिले आहेत. उदाहरणार्थ उदर व त्याचे तेरा प्रकार, अतिसार व त्याचे १२ प्रकार, उपदंशाचे बारा प्रकार, १९ प्रकारचा कर्णरोग, पंचवीस प्रकारचे

ज्वर व त्यांवर उपचार, १८२ जातींचे बालरोग, ८८ प्रकारचे वातरोग, ३५ प्रकारचीं विषें, १९२ प्रकारचे स्त्रीरोग व १५८ क्षुद्ररोग दिले आहेत. म्हणजे रोगांचें स्वरूप व त्यांवर उपचार याची माहिती दिली आहे. श्री. ओगले यांच्या दीर्घ प्रयत्नाची सामान्य कल्पना यावी एवढ्यासाठीं जरा तपशिलानें वरील यादी दिली आहे.

वरील अनेक रोगांवर श्री. ओगले यांनीं दिलेले उपचार, सांगितलेलीं औषधें हीं कोणाच्याहि आटोक्यांत व अगदीं अल्प प्रयत्नानें मिळणारीं असल्यानें पुस्तक गोरगरिबांस प्राणदा गुटिकेप्रमाणें उपयुक्त झालें आहे. हें पुस्तक वरवर चाळून पाहिलें तरीसुद्धां अशी खात्री पटते कीं, या भारतवर्षांत खेडोपाडीं स्वयंभू औषधालयें ईश्वरानें निर्माण करून ठेविलीं आहेत. डोळे उघडून पाहाणारा मात्र पाहिजे.

अशा प्रकारचें मराठींत हें पहिलेंच पुस्तक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या हजार पृष्ठांत श्री. ओगले यांनीं बहुतेक सर्व रोगांची सांगोपांग माहिती व त्यांवरील उपाय दिले आहेत. त्यांनीं दिलेली औषधें आयुर्वेदसंमत व अनुभवसिद्ध आणि तींहि प्रत्येक माणसाच्या आटोक्यांत सुलभपणें येणारीं असल्यानें पुस्तकाचें महत्त्व जास्तच झालें आहे.

मनुष्य आजारी पडेपर्यंत प्रकृतीची अगर वैद्यकशास्त्राची फिकीर करीत नाहीं. पण दुर्दैवानें तो आजारी झाल्यास त्याला हें महत्त्व पटूं लागतें. अनेक रोग असे असतात कीं, त्यांचा उद्भव होतांच औषधयोजना झाल्यास त्यांचें उपशमन होतें. त्यासाठीं प्रस्तुत ग्रंथ अत्युपयोगी असल्यानें प्रत्येक कुटुंबवत्सलानें तो अवश्य संग्रहीं ठेवावा अशी आमची शिफारस आहे.

असेच नवाकाळ, ज्ञानप्रकाश, वगैरेचे अभिप्राय आहेत.

# करंजोपयोग.



( संस्कृत ) करंज, नक्तमाल, चिरबिल्विक, घृतपूर्ण, पूतिक, प्रकीर्य, सोमवल्क. ( हिंदुस्थानी ) किरमाल, कंज, ( बंगाली ) दहर्करंज. ( गुजराथी ) करंज. ( तामीळ ) पुंगमरम्. ( तेलंगी ) कानगु. ( कानडी ) होंगे, हुलगलमर ( तुळवु ) कोर्गु. (मलाई. ) पोन्नम, ( कोंकणी. ) करंजेरूकु. ( मराठी ) करंज. ( इंग्रजी ) पोनोमिया, ग्लाब्रा Pongamia Glabra.

## गुणधर्म.

करंज हा तिखट, तीक्ष्ण, व उष्णवीर्य असून योनिदोषनाशक आहे. तसेंच—कोड, उदावर्त, गुल्म, मूळव्याध, जंत व व्रण व कफ नाशक आहे.

**पानांचे गुण**:—पानें वातकफजन्य मूळव्याधीचा नाश करणारीं, क्रृमि व सूजनाशक आहेत.

**तैलगुण**:—करंजाचें तेल, कडू, उष्ण, व्रणाला भरणारें, नेत्ररोग, विचर्चिका, वात, कुष्ट, कंडू, गुल्म, उदावर्त, अर्श, योनिदोष, क्रृमि व त्वग्दोष नाशक आहे.

**फळांचे गुण**:—कफवातनाशक असून मेह, मूळव्याध, क्रृमि व कोड नाशक आहेत. लहान करंजाचे गुणही वरप्रमाणेंच आहेत.

**अन्य मतें**:—करंज हा पाककाळीं, तिखट, नैत्र्य, उष्ण, सकाळीं कडू व तुरट, पाचक, व्रणरोपक असून उदावर्त, वायु, योनिदोष अर्श, वात, गुल्म, व्रण, कंडू, कफ, विष, विचर्चिका, पित्त, कास क्रृमि, त्वग्दोष, उदर, मेह व प्लीहा यांचा नाशक आहे. **फळें**—उष्ण

व लघु आहेत; व मस्तकरोग, वायु, कफ, कृमि, कुष्ट, अर्श, व मेह नाशक आहेत.

**चरकाचें मतः**—बियांतील लेखनीय. सुश्रुताप्रमाणें गुण—संशोधनीय, श्लेष्मसंशमन, कफवातसंशमन, रक्तशोधन, कुष्टघ्न, कफमेदोनिवारक आहे.

## वर्णन.

करंज वृक्ष हा रानटी असून पल्लवयुक्त, तुकतुकीत व हिरवट पानांनीं व्याप्त असतो. याची छाया दाट असून गार व आरोग्यकारक आहे, म्हणून सडकेच्या कडेस मुद्दाम लावतात. हा वृक्ष फुलला म्हणजे झाडाखालीं फुलाचें दाट हांतरूणच होतें. फुलें पांढरीं किंचित् तांबूस घोसयुक्त व बारीक असतात यांचा बहार पावसाळ्याच्या आरंभीं असतो; त्यावेळीं फुलांनीं युक्त असें हें झाड पांढरें व शोभादायक दिसतें. झाडाच्या डहाळ्या लोंबत्या असतात. याच्या बियांचें तेल मोठ्या प्रमाणांत निघतें; तें जाळण्याचें व औषधाचें कामीं फारच उपयोगीं पडतें.

## रसशास्त्र.

करंजाच्या बियांत १०० शेंकडा २७ सत्तावीस टक्के पिवळें तेल असतें. ह्यांस कर्नाटक व म्हैसूराकडे होंगेयण्णी अथवा हुलगलयण्णी असें म्हणतात. यांतील एक कडू द्रव्य मुख्य Alkaloid ( अल्कॅलोइड् ) आणि एक अम्लस्वभावी हिरवट उदी रंगाची राळ असते.

## उपयोग.

करंज हा वृक्ष उत्तम औषधोपयोगी आहे. ह्याचीं सर्वच अंगें औषधांच्या उपयोगीं आहेत. मूळ, पान, साल, फुलें, फळें, फळांतील बीं, व कोवळीं फळें हीं उपयोगीं आहेत, हें रोग प्रकरणांत

सांगितलें आहे. करंजाच्या बियांच्या तेलाचा औषधी उपयोग तर मोठा प्रसंशनीय असून दिवा लावला असतां शांत जळून उजेडापासून कंबरें, डांस, चिलटें, घुंगुरटीं हीं नाश पावतात. पानांचा उपयोग दुष्ट व्रणावर केल्यानें त्याचें शोधन होतें. करंजाच्या मुळाचा रस जुन्या व्रणास रोपण ( भरून ) आणतो. त्याच्या बियांतील तेलानें खरूज, व्रण, कोड, गजकर्ण यांस चांगला गुण येतो. ( हीं निखालस जातात. )

## १ अजीर्ण.

**१ वडवानल चूर्ण**—करंजसाल, हिरडे, सुंठ, पिंपळी, बेलफळ, तगर, चित्रक सर्व समभाग घेऊन चूर्ण करून दरवेळीं एक तोळा ताकांतून द्यावें. या चूर्णानें पुष्कळ भोजनही पचतें.

## २ अग्निमांद्य.

१ करंजसाल, बेलफळ, चित्रक, पहाडमूळ, कोवळें डाळिंब व हिंग या सर्व द्रव्यांचें चूर्ण घालून तयार केलेलें मुगाचें सांभारें ( आमटी ) बरोबर भोजन केलें असतां, कफातिसार जाऊन अग्नि प्रदीप्त होतो. दि. ७ सकाळसंध्याकाळ.

## ३ अतिसार.

**आमातिसारास**—सुंठ, पिंपळी, करंजाची साल, चिकणामूळ, धन व हिरडेदळ यांचें चूर्ण करून तें ऊन पाण्यांतून वयमानाप्रमाणें पाव तोळ्यापासून १ तोळा पर्यंत द्यावें. दि. ३.

**२ सर्व अतिसारास**—बिब्बे दुखंड केलेले आठ तोळे घेऊन भाजावें नंतर त्यांत सुंठ चार तोळे, हिरडेदळ, २ तोळे, करंजाच्या बिया १ तोळा, वावडिंगें, मेथी, जिरें व मोहऱ्या हीं प्रत्येकीं अर्ध अर्ध तोळा, ओवा २ तोळे, पिंपळी, हिंग, मिरीं, बिडलोण, सेंधेलोण, शहाजिरें व किरमणी ओवा हीं प्रत्येकीं १।१ तोळा घेऊन

सर्वांचें चूर्ण करून, सोसेल त्याप्रमाणें अर्ध किंवा १ तोळा घेऊन दह्यांबरोबर खावें. म्हणजे सर्व प्रकारचे अतिसार जातात. दि. ३।७.

## ४ अपस्मार.

१ **कल्याण चूर्णः**—करंज, सुरु, चित्रकमूळ, त्रिफळा, त्रिकटु, बीडलोण, मिरें, सैंधव, वावडिंगें, ओवा, धने, जिरें, यांचें वस्त्रगाळ चूर्ण ऊन पाण्यांतून १ तोळा प्रमाण घ्यावें. म्हणजे अपस्मार, उन्माद, *कठीण संग्रहणी हीं जातात. दि० ७।१४.

२ **त्र्यूषणांजन**—सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, करंज, सैंधव वेखंड, कुटकी, शिरस ( पांढऱ्या मोहऱ्या ) हीं सर्व समान एकत्र गोमूत्रांतून खलून वात लांबोडी करून तिचें अंजन केलें तर अपस्मार उन्माद व चातुर्थिक ज्वर हीं जातात.

३ **करंजादि योगः**—करंजाची बी, देवदार, मोहऱ्या, मालकांगोणी, हिंग, वेखंड, लाजाळू, हिरडा, बेहडा, आवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, गव्हला, ह्यांचें समभाग चूर्ण करून बोकडाच्या मुतांत खल करावा. हा योग नस्य अंजन व प्राशन यांस, उन्माद, अपस्मार, भूतबाधा यांस नाशक आहे. ( प्राशन करणें झाल्यास ऊन पाण्यांतून पाव तोळा घ्यावें. )

## ५ आनाह ( मलबद्ध रोग. )

१ भाजलेली तुरटी, ओंवा, पिंपळमूळ, काळीं मिरीं, करंजाचे बिजाचा गीर व वावडिंग हे सर्व पदार्थ समभाग घेऊन कुटून आल्याचे रसांत खलून चार मासे प्रमाणाच्या गोळ्या करून सेवन करीत जाव्या.

## ६ अंडवृद्धि.

१ **अंडवृद्धीस**—कुष्टरोगांतील अंक १ पहा.

२ तांदुळाच्या धुवणांत करंजाचें मूळ उगाळून लेप द्यावा. दि. ३.

१ हिरडा, बेहडा, आवळकाठी. २ सुंठ, मिरें, * पिंपळी, ताकांतून द्यावें.

३ लाख, करंजाची बी, सुंठ, देवदार, काव, कुंदा गवत, समान घेऊन कांजींत खलून लेप करावा. सूज व अंत्र वृद्धि जाते दि. ३.

### ७. आमवात.

१ करंजाची साल, हिरडेदळ, कचोरा व पोखरमूळ ह्या औषधांचा काढा सकाळसंध्याकाळ घेतल्यास आमवात जातो. दि. ७.

### ८ उदर.

१ गुल्मरोगांतील अंक २ चें औषध करावें.

**२ यकृत व प्लीहोदरास–करंज क्षारयोग**—करंजाचीं लाकडें जाळून त्यांची राख करून ती तिच्या ६ सहापट कांजींत रात्रीं भिजत घालून दुसरें दिवशीं आटवून चतुर्थांश उरल्यावर निवळून २१ वेळ गाळून त्या गाळलेल्या पाण्यांतून २ तोळे पाणी घेऊन त्यांत बिडलोण व पिंपळीचें समान चूर्ण मिसळून १ मासाभार घालून सकाळीं प्यावें. दि. ३।५।७.

**३ योगरत्नाकर**—करंजाच्या सालीचा क्षार करंजाच्या सालीच्या काढ्यांत शिजवून त्यांत बिडलोण व पिंपळी यांचें चूर्ण १ मासा घालून यकृत–पानथरी नाशार्थ द्यावा. सकाळीं दि. ३।७।१४.

४ करंजसाल, काळें निशोत्तर, दांतीमूळ, त्रिधारी निवडुंग, पांढरें निशोत्तर, शिकेकाईच्या बेलाचें मूळ, शंखाहुली, पांढरी गोकर्णीमूळ, बाहव्याची साल, बेलमूळ, कपिला व पिवळ्या कांटेधोत्र्याच्या मुळ्या ह्या औषधांचा तूप, तेल, चूर्ण, काढा, कल्क किंवा दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें योजून औषध तयार केलें असतां, उदावर्त, उदर, आनाह, विष व गुल्म हीं नाश पावतात. औषध रोगमानाप्रमाणें ७ ते २१ दिवस घ्यावें लागतें.

### ९ उदावर्त.

१ वारुळाची माती, करंजाची साल, मुळ्या, फळें व पानें

आणि मोहऱ्या हे सर्व जिन्नस गोमूत्रांत वांटून ओटीपोटावर लेप करावा; म्हणजे वायु सरून शौचास साफ होतें.

## १० उन्माद.

१ करंजबीज, पांढरें शिरस, वेखंड, हिंग, देवदार, मंजिष्ट, त्रिफळा, तुरटी, लहान कांगोणी, दालचिनी, त्रिकटु, राळे, दारुहळद हीं विषबाधेपासून झालेल्या उन्मादास चूर्ण करून बोकडाच्या मुतांतून १ तोळा प्यावें; अपस्मारास अंजन करावें. ज्वरास अंगास चोळावें. या औषधांनीं सिद्ध केलेलें तूप वरील रोगास पोटांत खाणेस उत्तम आहे.

२ **अंजन**—त्र्यूषणादिवर्ति–सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, सैंधेलोण, वेखंड, कुटकी, सिरसाचें बीं. करंजाचें बीं, पांढरे शिरस ह्यांचें चूर्ण करून गोमूत्रांत खलून सावलींत गोळी वाळवून ठेवून प्रसंगीं अंजन केल्यास उन्मादास हितकारक असून यानें चातुर्थिक ज्वर अपस्मार व उन्माद हीं जातात.

३ सिरसाचें व करंजाचें बीं मध व तूप यांबरोबर सोसेल तसें खावें; हा सामान्य उपाय आहे.

## ११ उपदंश ( गर्मी ).

१ करंजबीजाचा गर, अर्जुनसाल, आवळीची साल, वड, पिंपळ, पिंपरी, नंदीवृक्ष यांच्या सालींचा कल्क त्यांच्या काढ्यांत घालून, चौथाई तूप घालून कढवून तूप उरल्यावर गाळून ठेवून सकाळसंध्याकाळ २ तोळे दरवेळीं घेतलें असतां उपदंशाचा नाश होतो. दि. ७।१४.

२ **लिंगार्शावरः**—करंजाची बी, कडू वृंदावण, चित्रक, सैंधव, कडूनिंबाची साल यांचें समभाग चूर्ण करून त्याची धुरी मोडास

द्यावी. म्हणजे गर्मीनें शिश्नास आंत किंवा बोंडावर मोड आलेले जातात. दि. ५।७.

३ **करंजाद्यघृतः**—करंज, कडूनिंब, असाणा, शालवृक्ष, जांबूळ, वड, पिंपरी, पिंपळ, नांदरुख ह्यांच्या सालींचा कल्क व त्यांच्याच काढ्यांत मिसळून तूप सिद्ध करावें; त्याच्या सेवनानें आग, पाक, स्राव व लाली ह्यांचा नाश होतो. दि. ७।१४.

४ करंज, कडूनिंब, अर्जुनसादडा, सागवान, जांबूळ, वड यांच्या सालींचा कल्क व काढा यांत तूप सिद्ध करून तें लावलें असतां, दाह, पाक, स्राव व लाली यांसह उपदंशाचा नाश करितें.

५ करंजाचीं हिरवीं पानें सव्वा तोळा व कडूनिंबाचीं हिरवीं पानें सव्वा तोळा, या दोहोंचा रस काढून त्यांत काळ्या मिऱ्यांचें चूर्ण सहा मासे व चोपचिनीचें चूर्ण ४ मासे घालून सेवन करावें. याप्रमाणें सात दिवस करावें.

## १२ ऊरुस्तंभ.

१ करंजाच्या बिया व शिरस (पांढऱ्या मोहऱ्या) वांटून लेप करावा.

२ करंजाचें मूळ किंवा साल पाण्यांत उगाळून ऊन करून दाट लेप करावा. दि. ३।७.

## १३ कर्णरोग.

१ मुळ्याचा रस पावशेर, करंजाचें तेल व शिरसेल व रुईच्या पानांचा रस ह्या सर्वांत १ शेर पाणी घालून मंदाग्नीनें कढवून तेल गाळून ठेवावें. कान स्वच्छ धुवून त्याचे बिंदु कानांत घातले असतां, कानांतील पू वाहणें, कर्णशूळ हीं बरीं होतात.

## १४ कफरोग.

करंजबीजांचा अर्क काढून दररोज सकाळसंध्याकाळ मिऱ्यांची

पूड व टांकणखार २।२ गुंजाभार घेऊन अर्कांत खलून गोळी खावी. हें प्रमाण मोठ्या माणसाचें आहे. दि. ५।७.

**२ कफ पडण्यासः**—करंजाचीं कोवळीं पानें व सैंधेलोण३ गुंजाभार घालून वांटून डाळिंबाच्या रसांत घालून प्यावें, म्हणजे कफ वांति होऊन पडतो. हें प्रमाण मोठ्याचें आहे. लहानास कमी द्यावें.

## १५ कास ( खोकला. )

१ करंजाचीं कोवळीं पानें वांटून रस काढून त्यांत २।३ गुंजाभार मिऱ्यांची पूड व मध घालून घ्यावें. दि. ३ सकाळसंध्याकाळ.

२ काकडाशिंगी, करंजाच्या बियांतील गर, हिरडेदळ, मिरीं, जेष्ठमध, सर्व समान घेऊन पाण्यांत खलून रानबोराएवढ्या गोळ्या करून तोंडांत धरीत जाव्या. खोकला जातो. दि. ३।५।७.

## १६ कुष्टरोग.

कसल्याही कुष्टरोगांवर लेपाचें औषध लावीत असतां दररोज रात्रीं निजतेवेळीं हिरडा, बेहडा, आवळकाठी यांचें चूर्ण गुळांतून खाऊन वर ऊन पाणी पिऊन निजावें. म्हणजे मळशुद्धि होऊन रक्त शुद्ध होणेंस मदत होते.

१ करंजसाल व मूळ, रुईची साल, त्रिकटु, त्रिफळा, रासना, वावडिंगें, चित्रकमूळ, शिवणमूळ हीं सर्व बारीक वांटून १६ तोळे घेऊन १०० तोळे रिंगणिमुळाच्या चतुर्थांश काढ्यांत घालून नंतर त्यांत ६४ तोळे तूप घालून मंदाग्नीनें आटवून तूपच शिल्लक राहिल्यावर गाळून कांचपात्रांत ठेवावें; आणि दूधभाताबरोबर दीड किंवा दोन तोळे खावें, म्हणजे कुष्टरोग, मधुमेह, मूत्रकृच्छ्र, भगंदर, आलस्य,क्षय, अंडवृद्धि या रोगांचा नाश होतो. दि. २१।३०।४० दोन्हीं वेळां. सकाळसंध्याकाळ.

२ **गजकर्णास**—करंजाचें बीं, ताकांत उगाळून वरचेवर लेप करावा. दि. ७.

३ पांढरें कोड, दद्रु, खरूज, विचर्चिका यांस—करंजबीज, हळद, हिरडा, बांवच्या, वाव्हडिंगें, सैंधव, मोहऱ्या सर्व समान वांटून कल्क करून लेप करावा. दि. ७।१४।२१; चांगला गुण येतो.

४ करंजबीज, टाकळा, कोष्ठ हीं गोमूत्रांत समान सर्व वांटून कल्क करून लेप करावा; म्हणजे दद्रुकुष्ठाचा नाश होतो. दि. ३.

५ कुष्टनाशक खात्रीचा उपाय–पांढऱ्या कणेरीचें मूळ, करंजाच्या बिया, दारुहळदीची साल, जाईचा कोंवळा पाला, सर्व एकत्र वांटून गोमूत्रांत दाट शिजवून लेप करावा. दि. २१.

६ हिरडे, करंजबीं, मोहरी, हळद, रानबावच्या, वावडिंगें, सैंधव, यांचा गोमूत्रांत खलून लेप करावा. दि. १४।२१. रोज साबणानें धुवावें. कुष्टनाशक असा हा सोपा उपाय आहे.

७ रानबावच्या, करंज, आल्याच्या रसांत खलून लेप करावा. त्यानें व वरील लेपानेंही भयंकर व स्थिर झालेलें कुष्टही जातें. दि. १४।२१.

८ करंजाचें बीं व टाकळ्याचें बीं व कोष्ट यांचें चूर्ण गोमूत्रांत खलून त्याचा कुष्ठावर लेप करावा. हा उत्तम आहे. दि. १४।२१.

९ करंज, रुई, त्रिधारी निवडुंग व बाहवा यांचीं पानें व फुलें गोमूत्रांत वांटून लेप करावा. म्हणजे पांढरें कोड, दद्रु, व्रण, मूळव्याधीचे मोड, नाडीव्रणही जातात. दि. ७।१४।२१ रोगाप्रमाणें.

१० **लेप**—हिरडा, करंजाची साल, मोहऱ्या, हळद, रानबावच्या, व सेंधेलोण बावाडिंगें यांच्या लेपानें कुष्ठ जातें. दि. ७।१४.

११ करंजाचें बीं, टाकळ्याचें बीं, व कोष्ठ यांचा गोमूत्रांतून

लेप करावा. हा कुष्ट घालविण्याविषयीं फार उत्तम आहे. यांत गोकर्णीचें मूळही उगाळावें. दि. ७।१४।२१.

१२ करंजाची साल, पांढऱ्या कणेरीचें मूळ, कुड्याची साल, दारुहळद व जाईचीं पानें यांचा लेप कुष्ठनाशनाबद्दल प्रसिद्ध आहे. दि. १४।२१.

**१३ सर्षपादि चूर्ण**—शिरस, करंजाची साल, हळद, दारूहळद, देवदार, मंजिष्ट, हिरडा, बेहडा, आवळकाठी, कचोरा, खैराची साल, पांढऱ्या गोकर्णाचें मूळ अथवा वेखंड, मोरवेल, गव्हला, सुंठ, मिरें, पिंपळी, वेलची दाणे, तमालपत्र, दालचिनी, नागकेशर व लाख ह्यांचें चूर्ण गोमूत्रांतून अंगास फासावें. तें रक्तजन्य, पित्तजन्य अथवा वातजन्य टोंचणी, ठणका व फुटकुळ्या ह्यांनीं युक्त अशा कोडाचा नाश करितें. रोज मगदूराप्रमाणें.

**१४ वज्रतेल**—सातवीण, करंजाची साल, रुई, मालती, कणेर, त्रिधारी निवडुंग, सिरस, चित्रक, रानमोगरी, यांच्या मुळांचा काढा आणि करंजाचें बीं, त्रिफळा, त्रिकटु, हळद, दारुहळद, मोहऱ्या, टाकळ्याचें बीं, वावडिंगें हीं सर्व औषधें गोमूत्रांत वांटून त्यामध्यें तिळाचें तेल घालून कढवून तेल सिद्ध करावें, हें वज्रक नांवाचें तेल लावलें असतां फोड, नाडीव्रण, आणि दुष्ट व्रण नाश पावतात. दि. १४।२१.

**१५ पांढऱ्या कोडास**—करंजबीं, कणेरीचें मूळ, चित्रकमूळ, वावडिंगें यांच्या चूर्णास करंजबियांच्या तेलांत खलून रोज कोड साबणानें धुवून लावावें. उपाय चांगला आहे. दि. ७।१४।२१.

१६ करंज, रानअंजीर, बेहडा ह्यांच्या झाडाच्या सालींचा काढा अष्टमांश करून त्याची रानबावच्याच्या चूर्णास ७ पुटें देऊन, वाळवून ठेवावें. तें पावतोळा प्रमाण दरवेळीं रोग्यास गोमू-

त्रांतून किंवा पाण्यांतून पाजावें. तीन दिवसांनंतर अंगावर मोठमोठे फोड उठल्यास औषध लागू झालें असें समजून मुरडशेंगेच्या काढ्यांत करंजेल सिद्ध करून तें लावावें. कुष्ठ जाऊन अंगकांति पूर्ववत् होईल. पथ्य—गाईचें दूध, भात दि. २१.

१७ करंजसाल, चित्रकमूळ, बेहडादळ, रानअंजीरमूळ या सर्वांचें चूर्ण करून त्यास गोमूत्राच्या ७ भावना देऊन १ तोळा-प्रमाण चूर्ण गोमूत्रांतून सकाळीं १ वेळ प्यावें. याप्रमाणें ७ सप्तकें केल्यास सर्वप्रकारचीं कुष्ठें जातात.

१८ असाणा, खैर व करंज यांच्या सालींचा काढा अष्टमांश करून त्याचीं ७ पुटें रानबावच्यांस देऊन त्याचें समान चित्रकाचें व हिरडेदळाचें चूर्ण मिसळून दररोज सकाळसंध्याकाळ अर्धतोळा-प्रमाण चूर्ण व दोन गुंजाभार लोहभस्म, तूप व मध यांतून खावें. व केवळ दूध ( गाईचें किंवा शेळीचें ) भात अळणी खाऊन पथ्यानें रहावें. म्हणजे दुःख देणारें कठीणही कोड जाईल. दि. २१.

१९ करंजमूळ, पांढऱ्या कणेरीचें मूळ, कुटकी, वेखंड, बचनाग हीं सर्व दोनदोन भाग व मिरें १ भाग सर्व करंजाच्या तेलांत एकत्र खलून लेप केला असतां दद्रु ( गजकर्ण ) व मंडल कुष्ट, पांढरें कोड प्रसुप्त नांवाचें कुष्ट यांचाही नाश होतो. दि. १४।२१.

२० सातू, गहूं, कांसे, कुटकी, भारंगमूळ, करंजबीं, या सर्वांस मोराच्या पित्तांत व शेळीच्या मुतांत खलून, वाळवून चूर्ण करून ठेवून कुष्ट, गजकर्ण वगैरेस गाईच्या शेणाच्या रसांतून जोरानें घासून चोळावें. हा योग उत्तम आहे. दि. ७.

२१ मोरचुदाची लाही, हरताळ, कुटकी, सुंठ, मिरें, पिंपळी, रुईचे मुळावरील साल, बेलफळांतील गर, कडूनिंबाच्या निंबोण्या, करंजबीज, बाहव्याचीं पानें, वावडिंगें, हळद, दारुहळद, रिंगणी-

फळें, डोरलीफळें हीं सर्व एकत्र खलून लेप केल्यास कुष्टें समूळ जातात.

२३ बचनाग, रुईचें मूळ, करंजमूळ व साल, पांढऱ्या कणेरीची साल, समभाग एकत्र खलून मधांतून गुंजप्रमाण मात्रा सकाळसंध्याकाळ घ्यावी. दि. २१. सर्व प्रकारचीं कुष्टें जातात. पथ्य—अळणी दूधभात.

२४ **लेप**—जलपिंपळी ( पत्तूर ) च्या गड्डयाचें चूर्ण करंजाच्या तेलांतून खलून सुप्तकुष्टावर ( ज्यात स्पर्शज्ञान नष्ट होतें त्या कुष्टावर ) लावावें. ३ दिवसांनीं त्या ठिकाणीं फोड येतील. नंतर शुद्ध बचनाग व मिरें यांचें चूर्ण १ गुंजप्रमाण मध व तुपांतून खावें. १ महिना सकाळ संध्याकाळ. सुप्तकुष्ट निखालस जाईल.

२५ पांढऱ्या कणेरीचीं फुलें, करंजबीज, ताकांत थोडें सैंधव घालून खलून गजकर्णास चोळून लेप द्यावा. गजकर्ण ३।७ दिवसांत जाईल. मंडलकुष्ट, कंडू, खरूज हीं जातील.

२६ **कुष्टनाशक तेल**—कडु सुरण, चित्रक, माका, रुई, कोष्टसाल, सैंधेलोण, पादेलोण, बीडलोण, सांबरलोण, मीठ, गोमूत्र यांत करंजेल घालून कढवून गाळून घेऊन कुष्टादिकांस खाजवून लावावें. म्हणजे मंडलकुष्ट, दुष्टव्रण, दद्रु, किटिभ हीं जातात. दि. ३।७ १४।२१ रोगप्राबल्याप्रमाणें.

२७ रुईचा चीक सैंधव हीं करंजेलांत खलून ठेवून कुष्टास खाजवून चोळून लावावें. सर्वही त्वचारोग जातात. दि. ७।१४।२१.

२८ सर्व त्वचादोष, सर्व कुष्टें, वातरक्त ( रक्तपिती ) सुनबहिरी, विसर्प, विद्रधि, रक्तदोष हीं लवकर जाण्यास काढा—मंजिष्ठ, गुळवेल, कुंडा, सुंठ, वेखंड, नागरमोथे, हळद, दारुहळद, अडुळसा पित्तपापडा, उपळसरी, अतिविष, धमासा, कडूवृंदावन, वाळा, रिंगणी, कडूनिंब, कडूपडवळ, कोष्टकोळिंजन, कुटकी, भारंगमूळ, वावाडिंग, चित्रक, मोरवेल, देवदार, माका, इंद्रजव, पिंपळी, मेंदी,

पहाडमूळ, शतावरी,खैर, हिरडा, बेहडा, आवळकाठी, काडेचिराईत, बकाणनिंब, असाणा, बाहवा, काळें तेड, बावच्या, चंदन, वायवर्णी, सागवान, करंज या ४५ औषधांचा काढानिकाढा सांजसकाळ प्यावा; दि. २१. वरील सर्व रोग जातात.

## १७ कृमि.

१ करंजाच्या बियांचा अर्क २।४ थेंब घेऊन त्यांत हिंग गुंजभार घालून पाण्यांतून पाजावें. जंताचा नाश होतो.

२ करंजबी, पळसपापडी, ओंवा, कपिला व वावडिंगें सर्व समभाग घेऊन सर्वासमान गूळ घालून खलून लहान सुपारीएवढ्या गोळ्या करून सकाळसंध्याकाळ ऊन पाण्यांतून दिल्यास पोटांतील जंत नाश पावतात.

## १८ कंडू.

१ कंडू, खरूज, आगपेंण, घामोळें यांस करंजाच्या तेलांत लिंबूरस व कापूर घालून चोळावें.

२ जटामांशी, चंदन, बाहव्याचा पाला, करंजाची साल, कडूनिंबाचा पाला, पांढऱ्या मोहऱ्या, ज्येष्ठमध, कुड्याची साल, दारुहळद, यांचा लेप कंडू खरूज वगैरेंचा नाशक आहे.

## १९ खवडे,खरूज वगैरेंस.

१ रिठ्याच्या पाण्यानें किंवा साबणानें खवडे धुऊन पुसून नंतर करंजाचें तेल, लिंबाचा रस व कडूनिंबाच्या बियांचें तेल एकत्र खलून लावून वर येरंडाचें पान बसवून टोपडें बांधावें व रोज साबणानें धुवून औषध लावावें. दि. ७।१४.

२ करंजाच्या तेलांत जिरें २ भाग व शेंदूर १ तोळा खलून लेप करावा. कंडू, खरूज हीं जातात.

## २० गुल्म.

१ करंजबियांचा अर्क ४।६ थेंब घेऊन गोमूत्रांतून पाजावा. गोमूत्र ५ तोळे घ्यावें. हें मोठ्या माणसाचें प्रमाण समजावें. लहानास वयमानाप्रमाणें कमी द्यावें. दि. ७.

२ **द्वंद्वजगुल्मास**—चवक, चित्रक, सुंठ, मिरें, पिंपळी, कडू-वृंदावन व सैंधव ह्यांचा कल्क करून करंज व वड यांच्या पानांत गुंडाळून पुटपाकविधीनें भाजून तो पाण्यांतून किंवा मध घालून २ तोळे प्रमाण घ्यावा. दि. ३।७ दोन्हीं वेळां. उत्तम आहे. यानें उदर, पांडु, गुल्म, द्वंद्वज गुल्म जातात.

३ **रक्तगुल्मास**—करंजवृक्षाची साल, भारंगमूळ, पिंपळी, पिंपळमोड, देवदार यांचें चूर्ण तिळाच्या काढ्यांतून १ तोळा द्यावें. दि. ७।१४.

४ **रक्तगुल्मास**—शतावरी, देवदार, करंजाची साल, पिंपळी यांचें वस्त्रगाळ चूर्ण तिळाच्या काढ्यांतून वरप्रमाणें द्यावें.

५ **रक्तगुल्मास**—करंजमूळ, बाहवा, त्रिधारी निवडुंग, रुईच्या मुळाची साल, अंकोलसाल, जांभूळाची साल, कडू पडवळ, हळद, चिंच, पिंपळी, पुनर्नवा ( घेटोळी ), आघाड्याचें मूळ, समभाग मुळांचा कल्क करून पुटपाकविधीनें पक्क करून १ तोळा रस काढून ८ तोळे गोमूत्रांतून प्यावा. फक्त सकाळीं. दि. ७।१४.

६ **रक्तगुल्मास**—करंजसाल, दारुहळद, शतावरी, भारंगमूळ, पिंपळ्यांचें वस्त्रगाळ चूर्ण वरीलप्रमाणें तिळाचे काढ्यांतून द्यावें. दि. ७।१४.

७ **गुल्मरोगास**—करंजाचीं पानें पेजेंत ( भाताच्या ) उकडून त्यांत सैंधव घालून पाजावें. सकाळसंध्याकाळ दि. ७।१०. यानें पोट दुखणें कमी होऊन अन्न जिरतें.

८ **वरुणादि गणांतील**—( वायवर्णा, निळी व पिवळी कोरांटी, चित्रकमूळ, मोरवेल, बेलमूळ, मेढसिंगी, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, आघाडा, करंज, घाणेरा करंज (गजगा), काळा व पांढरा शेवगा, दर्भमूळ व रुईचें मूळ. ) या औषधांचा काढा त्रिदोषजन्य गुल्माचा तसेंच हृदय व बरगड्या यांतील शूळांनीं व उपद्रवांनीं युक्त अशा गुल्माचा नाश करितो. दि. ७.

९ **भारंग्यादि चूर्ण**—भारंगमूळ, पिंपळी, करंजाची साल, वेखंड व देवदार ह्यांचें चूर्ण तिळांच्या काढ्यांतून द्यावें. तें रक्तगुल्माची पीडा दूर करितें. दि. ७।१४.

## २१ गंडमाळा.

१ करंजाच्या झाडाचें मूळ तांदुळाच्या धुवणांत उगाळून त्याचा दाट लेप कुरंटक व गंडमाळा यांजवर करावा. दि. ३।५.

## २२ ज्वर.

१ **सर्व ज्वरांस लेप**—पांढऱ्या मोहऱ्या, वेखंड, करंजाची साल, देवदार, मंजिष्ट, हिरडा, बेहडा, आवळकाठी, हिंग, पांढरी किनी, दालचिनी, सुंठ, मिरें, पिंपळी, सिरसाची साल, हळद, दारुहळद हीं सर्व द्रव्यें समान घेऊन चूर्ण करून, त्यांचा फांट करून ओल्या फडक्याच्या बोळ्यानें रोग्याचें अंग शेकलें असतां, सन्निपात वगैरे सर्व ज्वर जातात. दि.३.

२ **सन्निपातज्वरावर**—करंजाची साल, पिंपळमूळ, बेहडा, बाळहिरडे, आवळकाठी व अडूळसा यांच्या काढ्यांत येरंडेल १ तोळा घालून घेतलें असतां, ज्वरांतील वातविकारानें मंदपणा आलेला जातो. दि. ३.

३ **रुग्दाह–सन्निपातास**—चंदनाचें गंध, बाळंतनिंबाच्या रसावरील फेंस, करंजाचीं पानें व बोरीचीं पानें सर्व पाण्यांत बारीक

वांटून तळपायांस लेप द्यावा. हा रुग्दाहसन्निपाताचा नाशक आहे. दि. ३.

**४ महाषट्पद–घृत**—करंजाची साल, चित्रकमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी, चवक, पादेलोण, जिरें, शहाजिरें, सोरमीठ, जवखार, बीडलोण, हिंग, शेरणी, सेंधेलोण यांचा कल्क करून आल्याचा रस व इतर जिनसांचा काढा ह्यांसह तूप तयार करून रोग्याच्या शक्तिमानाप्रमाणें १ किंवा दीडतोळ्यापर्यंत द्यावें. याचया योगानें अरुचि, अग्निमांद्य, पाणथरी, ज्वर व श्वास हीं जातात.

**५ हींवतापावर**—करंजाचें बीं चार मासे वजनी, पिंपळी चार मासे, पांढरें जिरें ४ मासें, जांभळीचीं पानें ४ मासे हे सर्व पदार्थ पाण्यांत खलून रानबोराएवढ्या गोळ्या करून सकाळीं दुपारीं व सायंकाळीं १।१ गोळी मधांतून खावी. दि. ३ थंडीताप राहतो.

## २३ नासारोग.

**१ नासार्श ( नाकांतील मोडास )**—करंजाची साल, चुलीवरील घरोसा, पिंपळी, देवदार, जवखार, सैंधव, आघाड्याचें बीं हीं सात औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून बारीक कल्क करून त्याच्या चौपट तिळाचें तेल घालून व तेलाचें चौपट पाणी घालून कढवून फक्त तेल शिल्लक राहिल्यावर गाळून कुपींत ठेवून नाकांतील मांसरूपी मोडास नाकांत घालावें म्हणजे मोड झडून जातो. दि. ७।१४।२१.

## २४ नेत्ररोग.

**१ डोळ्यांतलि फूल, मांसवृद्धि, भूर, इत्यादिकांवरः**—करंजबीजाचें चूर्णास पळसाच्या फुलाचे रसाचीं २१ पुटें देऊन खूप बारीक खलून वातीसारख्या लांबट गोळ्या करून ठेवून पाण्यांत उगा-

ळून अंजन करावें, म्हणजे वरील सर्व नेत्ररोग निखालस जातात. हें अंजन डोळ्यांतील रोग जाईपर्यंत १ दिवसाआड रात्रीं करावें व निर्वातस्थळीं रहावें.

**२ रातांधळ्यास**—करंजाची बी, कमळांतील केशर, चंदन, निळें कमळ, सोनकाव यांचा गाईच्या शेणाच्या रसांत खल करून अंजन करावें म्हणजे रातांदळें जातें. दि. ३.

**३ पापण्या खाजतात त्यांस**—सुंठ, मिरें, पिंपळी, माका, मनशीळ, हरताळ व करंजाचें बीं, यांचें चूर्ण करून, तेलांत खलून पापणीस चोळावें.

## २५ पांडुरोग.

१ गुल्मरोगांतील अंक २ चें औषध द्यावें.

## २६. पित्तरोग.

१ करंजाची साल उगाळून तें पाणी २ तोळे पाजावें. मग सुंठ-साखर खावी.

## २७ प्लीहा.

१ करंजाच्या सालींचा क्षार काढून करंजाच्याच सालीच्या काढ्यांत, शिजवून, बिडलोण व पिंपळी, ४।४ गुंजाभार घालून घ्यावा म्हणजे यकृत व पाणथरी हीं नाश पावतात. दि. ७ फक्त सकाळीं एकच वेळां.

## २८ प्रमेह.

१ **शुक्र**, मेह किंवा धातुमिश्रित मूत्रास—दुर्वा, पाण्यांतील शेवाळ, नागरमोथे, करंजसाल, कचोरा ह्यांचा काढानिकाढा मध घालून द्यावा. दि. ३।७.

**२ मधुमेहास**—कुष्टरोगांत अंक १ पहा.

३ मधुमेहास करंजाच्या फुलाचा फांट द्यावा. दि. २१.

४ **परम्यास**—करंजाच्या मुळाचा रस, नारळाचा रस, चुन्याची निवळी एकत्र करून ५ तोळेपर्यंत घ्यावी. सकाळसंध्याकाळ दि. ५।७.

५ **सर्वप्रकारचें प्रमेह व मूत्रकृच्छ्रें यांस**—वड, उंबर, पिंपळ, टेंटू, बाहवा, असन, कवठ, आंबा, जांबूळ, अर्जुनधावडा चारोळी, मोह, ज्येष्ठमध, लोध, वायवर्णा, कडूनिंब, कडूपडवळ मेढशिंगी, दांतीमूळ, चित्रक, तूर, करंज, हिरडा, बेहडा, आवळकाठी, कुडा, बिबा, हीं सर्व समभाग घेऊन बारीक चूर्ण करावें. हें मधांतून अर्धतोळा खावें. नंतर त्रिफळ्याचा काढा मूत्रशुद्धीकरितां घ्यावा. दि. ७।१४ दोहीं वेळां.

## २९ बालरोग.

१ **माकडखोकल्यास**—करंजाच्या कोंवळ्या शेंगांची माळ गळ्यांत बांधावी.

२ करंजाच्या कोंवळ्या पाल्याचा रस काढून मध घालून चाटवावा. दि. ३।५।७ सकाळीं एकदां; खोकला हटकून राहतो.

३ खरूज, पैण, घामोळें, नायटे, खवडे, गजकर्ण वगैरे त्वग्रोगांस—करंजाच्या तेलांत कापूर, ओंव्याचें फूल व पुदीन्याचा अर्क (पेपरमिंट) घालून लावावें व न्हातेवेळीं साबणानें धुवावें. ह्यानें वरील सर्व रोग हटकून बरे होतात. हें औषध रोग्याच्या मानानें ३ पासून १४ दिवस लावावें.

४ **डांग्या खोकल्यास**—करंजाची बी मधांत उगाळून चाटवावी. दि. ५।७.

५ दहा दिवसांच्या आंतील मुलें मुठी वळूं लागलीं व हातपाय ताणूं लागलीं म्हणजे करंजाची मुळी काळ्या रेशमी दोऱ्यानें गळ्यांत व दंडांत बांधावी व त्या मुलास बेल, टाकळा, करंज, यांच्या

मुळांचा चौथाई म्हणजे आटवून चवथा हिस्सा राहिलेला काढा निवाल्यावर त्यानें न्हाऊ घालावें.

६ **यकृतवृद्धीस**—करंजाचे पानांचे रसांत वावडिंग व पिंपळी यांचें चूर्ण वयमानाप्रमाणें दरवेळीं २ ते ५ गुंजाभार चाटवावें. दि. ३।७.

७ **मुलाच्या वाढीस**—सातवीण, सूर्यफूल, करंज, कणेर, ह्यांच्या मुळ्यांचें चूर्ण करून गोमूत्रांत वांटून मुलाच्या अंगास लावून आणि वाळा व गोरखमुंडी घालून तापविलेल्या पाण्यानें मुलास न्हाऊं घालावें. म्हणजे मूल लवकर वाढतें व पुष्ट होतें.

## ३० भगेंद्र.

१ **भगंदरास**:—कुष्टरोगांतील अंक १ पहा.

२ रिंगणीमूळ व गुळवेल १००।१०० तोळे घेऊन ४०९६ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करावा. नंतर त्या काढ्यांत ६४ तोळे तूप व सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, रासना, वावडिंग, चित्रकमूळ, शिवणमूळ, करंजाची साल, दालचिनी ह्यांचा कल्क १।१ तोळा घालून तूप सिद्ध करावें. तें प्रातःकाळीं २ तोळे प्रमाण सेवन करावें. वर दूधभाताचें पथ्य करावें. म्हणजे भगेंद्र, मधुमेह, मूत्रकृच्छ्र, अंत्रवृद्धि, क्षय, व कुष्ट हे रोग जातात. दि. ७।१४।२१.

## ३१ मस्तकरोग.

१ मस्तकशूळ, कफ, गुल्म, मेदोरोग, अंतरविद्रधि या रोगांस काढा:—करंज, शतावरी, कडूतोंडलीचें मूळ, कमळ किंवा गहुला किंवा कोंवळें बेलफळ, अघाडा, चित्रक, एरण (लहान व थोर) गोड व कडू शेवगा, रिंगणी व मोतरिंगणीमूळ (पांढरा पिंवळा, काळा) कोळिस्ता, मोरवेल, काकडशिंगी, किराईत, मेढशिंगी या

सर्व औषधांचा काढानिकाढा करून प्याल असतां ,वरील सर्व रोग जातात. दि. ७।१४।२१.

२ करंजाचें बी पाण्यांत उगाळून त्यांत थोडा गूळ घालून किंचित् ऊन करून नाकांत घालावें. सूर्योदयाचे वेळीं घातल्यास अर्धशिशी राहते. दि. ३.

३ करंजबीं, शेवग्याचें बीं, तेजबळ, सरसू ( पांढरी मोहरी ) दालचिनी सर्व समान चूर्ण करून तपकिरीसारखें नाकांत ओढलें तर सर्व मस्तकरोग जातात.

४ **डोक्यांतील चाईस**—करंजाचीं फुलें वांटून त्यांत कापूर घालून बांधावीं. दि. ५।७.

५ **मस्तकाचे टक्लास**—जाईचा पाला, कणेरीचीं फुलें, चित्रक-मूळ, व करंजबी यांचा कल्क घालून तेल सिद्ध करून चोळावें. केश येतात. दि. १४।२१.

६ करंज व शेवगा यांचें बीं, आणि तमालपत्र व सिरसाची साल यांचें चूर्ण करून तपकिरीप्रमाणें नाकांत ओढावें. हें सर्व मस्तक-रोगावर शिरोविरेचन उत्तम आहे.

## ३२ मुखरोग.

१ मुखावरील वांगास ( काळ्या डागास ) करंजाचें बीं गाईच्या दुधांत उगाळून वांगास लेप करावा. दि. ७ रात्रीं.

२ करंजाचे काष्टानें दांत घासावे. अरुचि जाते.

## ३३ मूत्ररोग.

१ **मूत्रकृच्छ्रास**—करंजाची बी ताकांत बारीक खलून जवखार अर्धमासा घालून वाटीभर ताक प्यावें. दि. ७.

२ करंज, अकोल, निवळी, साग, कमळबीज यांच्या बियांचा

कल्क व गूळ १ तोळा घेऊन ऊन पाण्यांत घालून घ्यावा. बारीक मूतखडे पडतात. उत्तम आहे. दि. ७ दोही वेळां.

३ **अश्मरीजन्य मूत्रकृच्छ्रास**—सातवीण, बाहवा, सुपारी, करंज, कडूनिंब, कुडा, व गुळवेल ह्यांच्या सालींचा काढा करून त्यांत वेलदोड्याचें चूर्ण ४ गुंजाभार व मध घालून प्यावा. भयंकर मूतखडा जातो. काढानिकाढा दि. ७।१४।२१.पथ्य—तूप, दूध,भात.

४ करंजाची साल, वड, उंबर, पिंपळ, दिंडा, बाहवा, असाणा, आंबा, कवठ, जांभूळ, यांच्या साली व चारोळी, अर्जुनसादडा, धावडा यांच्या साली आणि ज्येष्ठमध, मोहाची साल, लोध्र वायवर्णी कडूनिंब यांच्या साली, कडूपडवळ, मेढशिंगी, दांतीमूळ, चित्रकमूळ, पाडळमूळ, त्रिफळा, इंद्रजव व बिब्बे हीं सर्व औषधें समभाग घेऊन सूक्ष्म चूर्ण घेऊन मधाबरोबर १ तोळापर्यंत खावें. म्हणजे मूत्र स्वच्छ होतें व वीस प्रकारचे प्रमेह व मूत्रकृच्छ्रें आणि प्रमेहसंबंधी इतर रोग नाश पावतात. दि. ७।१४।२१.

५ करंजाचे बिजाचा गीर कुटून तीन मासे मधांत दररोज खावा. प्रत्येक दिवशीं एक मासा वाढवीत जावा व अकरावे दिवशीं पुन्हां दररोज एक मासा कमी करीत जावा. मूतखडा जातो.

६ **अश्मरीस**—करंजाची अंतरसाल वाळवून त्याची राख करावी. तें भस्म सहा मासे घेऊन एक किंवा दोन तोळे मधांत सेवन करीत जावें. दि. १४।२१.

## ३४ मूळव्याध.

१ त्रिधारी निवडुंगाचा चीक, हरताळ, व करंजाचे बियांचा अर्क एकत्र खलून मोडास लेप केल्यास आग न होतां मूळव्याधीचे सूजयुक्त मोड गळून जातात. दि. ३।७.

२ **रक्ती मूळव्याधीस**—करंजसाल, चित्रक, सैंधव, सुंठ इंद्रजव, टेंटूमूळ यांचें चूर्ण ताकांतून सकाळसंध्याकाळ प्याल्यास रक्ती मूळव्याध मोडासह जाते. दि. ७।१४.

३ **वातार्शास**—करंजमूळ व काटेधोत्रा यांचा रस एकत्र करून लेप केल्यास निःसंशय वातार्श जातात. दि. ७.

४ **कफार्शावर**—करंजसाल, हिरडा, चित्रक, सुंठ, मिरें, पिंपळी, कडूपडवळ यांचा काढानिकाढा जवखार ४।५ गुंजाभार घालून घेतल्यास कफार्श, संग्रहणी, प्लीहा, गुल्मोदर व गुदद्वाराचे रोग जातात. दि. ७।१४.

५ रुईचा चीक, त्रिधारी निवडुंगाचें कांडें, कडू दूधभोपळ्याचा पाला, करंजाच्या बिया, बोकडाचे मुतांत वांटून लेप केल्यास मोड जातात. दि. ७।१४.

६ **करंजादि चूर्ण**—करंजाच्या बिया, चित्रक, सैंधव, सुंठ, इंद्रजव, टेंटू यांचें समभाग चूर्ण ताकांतून दरवेळीं १ तोळा प्यावें. म्हणजे सर्व तऱ्हेची मूळव्याध जाते. १४।२१.

७ **मोड मुळासह जाण्यास**—करंजसाल, टेंटूच्या मुळाची साल, चित्रकमूळ, इंद्रजव, सेंधेलोण व सुंठ यांचें चूर्ण सात दिवस सकाळसंध्याकाळ ताकांतून १।१ तोळा घेतल्यास मूळव्याधीचे मोड मुळासह गळून पडतात.

८ करंजाची बी, रुईचा चीक, त्रिधारी निवडुंगाचा दांडा कडू-भोपळ्याचीं पानें यांचा शेळीच्या मुतामध्यें वांटून कल्क करून मूळ-व्याधीचे मोडांस लावावा, हा फार उत्तम आहे. दि. ३।७।१४.

९ सेंधेलोण, करंजाचें बीं, देवडांगरीचें बीं हें कांजींत वांटून मोडास लेप केला असतां, न हलणारे मोड देखील गळून पडतात. दि. ३।५.

१० वडाची व करंजाची पिकलेली वाळलेली पानें जाळून राख करून करंजाच्या तेलांत खलून मूळव्याधीस लेप करावा. शौचा-नंतर दि. ७. +

## ३५ रक्तपिती ( वातरक्त. )

१ करंजाच्या पानांचा अंगरस, दहीं, मीठ व मिरपूड घालून द्यावा. म्हणजे रक्तपिती ( वातरक्त ) जातो. दि. २१.

२ केशर, कमळ, नागरमोथे, दालचिनी, तमालपत्र, वेलची, नागकेशर, हिरडा, बेहडा, आवळकांठी हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून दरवेळेस करंजसाल व सुंठ ह्यांच्या काढ्यांतून अर्धतोळा प्रमाण चूर्ण घ्यावें. ह्यानें सर्वप्रकारचीं कुष्टें, गलितकुष्टेंहीं जातात. दि. ७।१४।२१ सकाळसंध्याकाळ.

३ रानअंजीराचें मूळ, करंजमूळ, ब्रह्मदंडीमूळ, हिरडा, बेहडा, आवळकांठी ह्यांचें चूर्ण दरवेळीं अर्ध किंवा १ तोळा घेऊन मधांतून खावें. म्हणजे केश झडलेलें, रक्तमांस गळणारें किंवा पू झालेलें, असलेंही भयंकर कुष्ट जातें. दि. १४।२१ सकाळसंध्याकाळ.

## ३६ वातरोग.

१ वातानें मेहरी येते ( अंग शून्य पडतें ) अथवा मुंग्या आल्या-सारखें वाटतें त्यास—करंजेलांत कडू सुरणाचा गड्डा किसून घालून कढवून निवाल्यावर लावावें. दि. ७.

२ **वातानें अंग दुखतें त्यास**—करंजाचा पाला ऊन करून त्यानें शेकावें व मिरपूड करंजेलांत घालून खलून चोळावें.

३ **संधिवातास**—करंजाच्या पाल्यानें शेकावें व कापूर घालून करंजेलाचें तेल चोळावें.

---

+ दररोज १ करंजाची बी २ तोळे साखरेंतून खावी, म्हणजे रक्ती मूळव्याध व मूळव्याधही जाते. दि. ७।१४.

४ **ऊरुस्तंभवातास**—दाह झाल्यास—गोमूत्रांत करंजाच्या बिया व मोहऱ्या वांटून लेप करावा.

५ **पोटली**—उंडीण, एरंड, बाळंतानिंब, बकूळ, सागरगोटा, नारळ, करंज, कापूर, शेवगा, निळूंबी, कुरडू, शिरस, अंकोल ह्यांचें बीं, रास्ना, कोष्ट, हुलगे, लसूण, वेखंड, हिंग, मोहऱ्या, सुंठ, पंचलवणें व तेल, तूप वगैरे चार प्रकारचीं स्नेहद्रव्यें ह्यांची पोटली अथवा पोथंडी वातनाशक आहे.

६ **गरमीनें सांधे धरितात त्यास**—मालकांगोण्या २ तोळे, कायफळ १ तोळा, बकाणनिंबाचीं फळें किंवा साल १ तोळा, सुंठ १ तोळा, कथल्या गोंद १ तोळा, जायफळ १ तोळा, अक्कलखार १ तोळा, वेलचीदाणे १ तोळा, लवंगा १ तोळा, हळद १ तोळा, सेंधेलोण १ तोळा, कुचला १ तोळा, बदाम गोळे १ तोळा, करंजसाल १ तोळा, कोष्ट १ तोळा, कोळिंजन १ तोळा, काळ्या धोतऱ्याचीं पानें १ तोळा, मांदाराचें मूळ १ तोळा, शेवग्याची साल १ तोळा, कांगोणीचीं पानें १ तोळा, माक्याचीं पानें १ तोळा, हीं सर्व घेऊन कुटून शिरसाचें तेल, करंजाचें तेल, तिळाचें तेल व एरंड्याचें तेल, सर्व १।१ शेर घालून ८ शेर पाणी घालून मंदाग्नीनें कढवून फक्त तेल शिल्लक उरल्यावर गाळून ठेवून नित्य अंगास मर्दन करावें म्हणजे उपदंशसंबंधीं सर्व वात, पंगुत्व, संधिवात, कंपवात ह्या सर्वांचा नाश होतो. दि. ७।१४।२१.

७ रंगारी हिरडेदळ, बाळहिरडे, शेपा, काळीं मिरीं, पिंपळी, करंजाच्या बियांतील गीर व शहाजिरें हीं प्रत्येक दोन दोन भाग व काळ्या मोठ्या मनुका पांच भाग हीं औषधें कुटून वस्त्रगाळ करून सहा मासे प्रमाणाच्या गोळ्या पाण्यांत खलून कराव्या; व सांजसकाळ सेवन करीत जाव्या; म्हणजे सर्वप्रकारच्या वातरोगांचा नाश होतो.

८ **वातानें अंग ठणकतें त्यास**—करंजसाल किंवा पानें ऊन करून बांधावीं.

## ३७ वांति बंद होणेस.

१ करंजाचें बीं थोडें भाजून तुकडे करून वरचेवर खावें. म्हणजे मोठी भयंकर वांतिही राहते.

२ करंजाचीं कोवळीं पानें.सैंधेलोण व लिंबाचा रस ह्यांजबरोबर खाल्यास ओकारी जाते व कफही जातो.

## ३८ विषनाश.

१ **उंदराचें विषास**--करंजाची साल व बी उगाळून लेप करावा. विष उतरतें.

२ **सर्पदंशास**—करंजाचें बीं, सुंठ, मिरें, पिंपळी, बेलाचें मूळ, हळद, दारूहळद, व चिरफळाचीं फुलें शेळीच्या मुतांत सर्व खलून अंजन करावें, म्हणजे साप चावलेला मनुष्य बेशुद्ध असला तरी शुद्धीवर येतो.

३ **विंचू चावल्यास**—मनशीळ, कोष्ट, करंजाचें बीं, शिरसाचें बीं, शिवणीचें बीं, ह्यांची गोळी करून ठेवावी. ही गोळी तोंडांत धरावी व दंशाचें ठिकाणीही पाण्यांत उगाळून लेप करावा.

## ३९ विषूचिका ( पटकी ).

१ करंजसाल, निंबसाल, अघाडा बी, गुळवेल, तुळस, कुडासाल यांचा काढा दिल्यानें वांति होऊन भयंकर पटकीही बंद होते.

२ **दुसरा काढा**—सुंठ, मिरें, पिंपळी, करंजाचें बीं, हळकुंड, मैहाळुंग मूळ ह्यांचें चूर्ण आलें किंवा लिंबूरसांत खलून गोळ्या सावलींत वाळवून ठेवून ह्याचें अंजन केल्यानें विषूचिका व मस्तकरोग जातात.

३ **नस्य व अंजन**—सुंठ, मिरें, पिंपळी करंजाची बी व हळद हीं आंबट लिंबाचें रसांत खलून अंजन करावें, अथवा नस्य करावें व वर ऊन पाणी प्यावें.

४ महाळुंगाची मुळी, व करंजाची बी, हळद व सुंठ, मिरें, पिंपळी या सर्वांचा खल करून लांबोड्या गोळ्या करून सावलींत वाळवून ठेवाव्या. याच्या अंजनानें विषूचिका जाते व मस्तकशूळही जातो.

५ करंजाची बी, निंबाची साल, अघाडा, गुळवेल, अर्जुनसादडा व कुड्याची साल ह्यांचा काढा करून घेतला असतां वमन होऊन भयंकर विषूचिकेचा नाश होतो.

## ४० विसर्प ( धांवरें ).

१ करंजाची साल, सात्वणीची साल, कळलावी, त्रिधारी निवडुंग व रुई यांचे चीक, चित्रकमूळ, माका, हळद व बचनाग यांचा कल्क व गोमूत्र यांतून तेल सिद्ध करावें. तें लावलें असतां, विसर्प, विस्फोट, विचर्चिका जातात.

## ४१ विस्फोट.

१ **करंजतेल**—करंज, सातवीण, त्रिधारी निवडुंग, रुईचा चीक, चित्रक, माका, हळद, गोमूत्र, ह्यांनीं तयार केलेलें तेल लावलें असतां विस्फोट, विचर्चिका, विसर्प हीं जातात. दि. ७.

## ४२ व्रण.

१ करंजबियांच्या अर्कानें कसलेही व्रण, जखमा फार लवकर भरून येतात. जखमा, व्रण त्रिफळ्याच्या काढ्यानें रोज धुवावें.

२ **व्रणांतील कृमि नाश होणेस**—करंज, कडूनिंब व निर्गुडी यांचीं पानें वांटून लेप द्यावा अथवा रस लावावा.

**३ मर्माश्रित वाहणारे, खोल वेदनायुक्त व नाडीव्रण, शुक्र-व्रण शुद्ध होऊन भरून येण्यास**—जाई, कडुनिंब व कडुपडवळ यांचा पाला, कुटकी, दारुहळद, हळद, उपळसरी, मंजिष्ट, हिरडे, मेण, मोरचूद, ज्येष्टमध, करंजाचें बीं यांनीं सिद्ध केलेलें तूप घालावें.

४ बाल, वृद्ध, नाजूक, अशक्त मनुष्य व स्त्रिया यांना झालेल्या व्रणाची सूज किंवा मर्मावर झालेल्या व्रणाची सूज फोडण्यास करंजाची बी, बिब्बा, दांतीमूळ व चित्रकमूळ व कणेरीचें मूळ यांच्या कल्काचा लेप करावा म्हणजे सूज जाते. दि. ३.

**५ व्रणांतील कृमी जाण्यास**—करंज, कडूनिंब व निर्गुंडी यांच्या पानांचा रस घालावा म्हणजे कृमींचा नाश होतो.

**६ नाडीव्रणास**—जाई, रुई, वाहवा, करंज, यांचीं मुळें सैंधव, पादेलोण, जवखार सर्व खलून त्याची वात व्रणांत घालावी. नाडीव्रण त्वरित बरे होतात. दि. ३।७.

**७ व्रणरोगांस**—करंजाचीं पानें १॥ तोळा व कडूनिंबाचीं पानें १॥ तोळा आणून वांटून त्याच्या चकत्या करून पावशेर तेलांत सोडाव्या व खालीं मंदाग्नि लावून त्या चकत्या जळल्या म्हणजे त्यांत मोरचुदाचें चूर्ण एक मासाभार घालावें व दररोज प्रातःकाळीं एक तोळ्यापासून दीड तोळ्यापर्यंत सेवन करीत जावें. दि. ७।१४.

## ४३ शूळ.

**१ शूळ, गुल्म, अंतरविद्रधि यांस**—करंज, वायवर्णा, शेवगा लहान टाकळा उसाचें मूळ, मोठा टाकळा, बेल, तोंडली, सांबरमीठ, चित्रक, पादेलोण, मेढशिंगी, शतावरी, दर्भ, रिंगणी, डोरली ह्यांचा अष्टमांश काढा व निकाढा रोगाचे मानानें ७।१४।२१ दिवस घ्यावा.

२ करंजाची साल, पादेलोण, सुंठ, हिंग, याचे प्रत्येकीं सम-

भाग चूर्ण करून कोमट पाण्यांतून अर्धतोळा सुमार घेतलें असतां, वातशूळाचा लवकर नाश होतो. दि. ७।१४.

## ४४ सूज.

१ गुल्म रोगांतील अंक २ चें औषध द्यावें.

२ सूज पक्क होऊन तशीच राहिल्यास—करंजाची साल, दंतीमूळ, चित्रकमूळ, गोदंती हरताळ, कणेरमूळ हीं औषधें कांजींत वांटून लेप द्यावा.

३ **कसल्याहि सुजेस**--करंजाचीं पानें व निर्गुडीचीं पानें एकत्र वांटून ऊन करून बांधावीं. सूज लवकर उतरते.

४ नुसतीं करंजाचीं पानें कांजींत वांटून ऊन लेप करावा.

## ४५ हृद्रोग.

१ **वातज हृद्रोगास**—करंजसाल, पोखरमूळ, सुंठ, वेखंड, अजमोदा, पळसाचें बीं, कचोरा, देवदार ह्यांच्या काढ्यांत जिऱ्याची पूड व मीठ घालून प्यावा. दि. ७.

२ **पुष्करादि काढा**--पोखरमूळ, महाळुंगाचें मूळ, पळसाचें मूळ, करंजाची साल, कचोरा व देवदार ह्यांचा काढा करून त्यांत सुंठ, जिरें व वेखंड यांचें चूर्ण व जवखार व सैंधेलोण घालून तो ऊन ऊन असा प्राशन करावा. दि. ७.

## ४६ क्षुद्ररोग.

१ **अंगाची दुर्गंधी जाण्यास**--करंजाची साल, हिरडे, लोध्र, कडूनिंबाचीं पानें, डाळिंब फळाची साल, जांभळीची साल, ह्यांच्या काढ्याचें उटणें लावून स्नान केलें असतां, अंगाची दुर्गंधी जाते. दि.७.

२ करंजाच्या मुळीचें चूर्ण तांदळाच्या धुवणांत खलून त्याचा कुरंडकावर व गालगुंडावर लेप करावा. दि. ३।७.

**३ कसल्याही जखमेस**—कुटकी, मेण हळद, ज्येष्टमध, करंजाचीं फळें व पानें, कडू पडवळ, मालतीचीं फुलें व कडूनिंबाचीं पानें यांचा कल्क व काढा यांत तूप कढवून गाळून तें जखमेस लावल्यास बरें होऊन डागही जातात. दि. ७.

**४ चिखल्या रोगास**—करंजाचें बीं, हळद, हिराकस, पद्मकाष्ट, मध, गोरोचन व हरताळ, यांचा लेप लावला असतां, अलस (चिखल्या रोग) जातात.

**५ डोक्यांतील चाईस**—जाईचा पाला, करंजाची साल, वायवर्णा, कणेरीच्या मुळ्या चित्रक, ह्या औषधांच्या काढ्यांत तेल सिद्ध करावें. तें लावलें असतां चाईचा नाश होतो. दि. ७।१४.

———